पुरस्कृत प्रकाशन. १

# तृणाची वेदना

लेखक :

तु. शं. कुळकर्णी

म रा ठ वा डा सा हि त्य प रि ष द्

किंमत अडीच रुपये

प्रकाशक :
रा. ब. माटेकर
अध्यक्ष :
मराठवाडा साहित्य परिषद्,
इसामिया बाजार, हैदराबाद–द.

आवृत्ति पहिली
आक्टोबर १९५५

मुखपृष्ठ :
चित्रकार श्री. भगवान भालेराव

मुद्रक :
जयहिंद प्रिंटिंग प्रेस,
मालक : भारत मुद्रक आणि प्रकाशक लि.
नारायणगुडा, हैदराबाद–द.

# आ शी र्वा द

श्री. तु. शं. कुळकर्णी यांचा हा पहिला वहिला कथासंग्रह प्रसिद्ध होत आहे हें पाहून मनास समाधान होतें. बरेच दिवसांपासून त्यांच्या कथा महाराष्ट्रांतील अनेक मासिकांतून येत आहेत. आज संकलित स्वरूपांत त्यांना वाचकांच्यापुढें येण्याचें भाग्य लाभत आहे. श्री. कुळकर्णी हे हाडाचे कथालेखक आहेत. त्यांनीं एका विशिष्ट दृष्टीची जोपासना केली असून तिचें प्रत्यंतर प्रस्तुत पुस्तकांत पदोपदीं येतें. जीवन सारेच जगतात, पण त्याजकडे पाहण्याची विशिष्ट दृष्टि प्रतिभावंतालाच असते. पुस्तकाच्या नांवावरूनच ती दृष्टि कळण्यासारखी आहे. तृणवत् जीवन जगणाऱ्या व्यक्तींच्या ह्या वेदना आहेत. दांतीं तृण धरल्यावर शत्रुसुद्धां प्राण घेत नाहीं, असा तृणाचा उपयोग असला तरी आपण तृण नेहमीं तुडवितोंच. पण त्यालाहि वेदना होत असतील, याची कल्पना कोणास असते ? सहृदयावांचून हें दुःख कोणास कळणार आहे ? श्री. कुळकर्णी यांनीं ह्या वेदना हलुवार हातानें; गवताहून लीन होऊन, सकाळच्या दंहिवराचें सिंचन असलेल्या गवती फुलांच्या सौंदर्यानें व्यक्तविल्या आहेत. वातावरण निर्माण करून व्यक्तिचित्रण करण्यांत, आणि व्यक्तींच्या अंतर्मनांतील कोपरा न् कोपरा धुंडाळून काढण्यांत श्री. कुळकर्णी यांनीं अत्यंत कौशल्य प्रगट केले आहे. कथालेखनांतील आधुनिक तंत्र आत्मसात् करून वाचकांपुढें प्रगट झालेल्या ह्या कथा महाराष्ट्रीय कथालेखकांत त्यांना मानाचें स्थान प्राप्त करून देतील असें त्यांच्या आजच्या ह्या लेखनावरून निश्चित वाटतें. श्री. कुळकर्णी यांचा हा प्रयत्न रसिकांच्या कौतुकास पात्र होवो अशी शुभेच्छा मी प्रगट करतो.

**– डॉ. ना. गो. नांदापूरकर,**
एम्. ए. पीएच्‌डी.
उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबाद.

## प्रकाशकाचें दोन शब्द

मराठवाड्यांतलि सांस्कृतिक, वाङमयीन आणि कलोपासक जीवनाला अशांतच आरंभ झाला आहे. गेल्या राजवटीच्या प्रतिरोधी उपेक्षावृत्तीमुळें हैदराबाद राज्यांत ज्ञानप्रसार झाला नाहीं. साहित्य-निर्मिति लोपली. रसवृत्ति बधिर झाल्या आणि सांस्कृतिक मूल्यें गोठलीं. परिणामतः निकटवर्ती प्रदेशांतील जनता मोठ्या उल्हासानें आणि आवेशानें प्रगतीचा मार्ग आक्रमण करीत असतां हैद्राबाद संस्थानांतील जनत मात्रा "जैसे थे" च्या अवस्थेंत मरगळून गेली होती.

स्वातंत्र्याच्या प्रभातकाळीं जीवनाच्या सर्वच कक्षा मोहरून गेल्या. एक नव चैतन्य सळसळलें आणि सर्वच अंगोपांगांतून क्रियाशीलता प्रत्ययास येऊं लागली. मराठवाडा साहित्य परिषदेच्या कार्यालाहि याच काळांत भर आला.

हैदराबादेंत साहित्य प्रकाशनाचे प्रयत्न यापूर्वी वैयक्तिक आणि सामूहिक रूपांत झाले.पण ते सर्वच क्षीणप्रभ आणि अल्पकालिक ठरले; कारण परिस्थितीच्या प्रतिकूल क्षेत्रांत त्या प्रयत्नांना मूळ धरतां आलें नाहीं.

मराठवाडा साहित्य परिषदेनें हैदराबाद राज्यांतील मराठी भाषिकांत वाङमयाभिरुचि निर्माण करण्याच्या दृष्टीनें जीं विविध विधायक कार्यें हातीं घेतलीं त्यांपैकीं वाङमय प्रकाशन हें एक प्रमुख कार्य आहे.

गेल्या तीन वर्षांपासून विशेषतः स्थानीय साहित्यिकांना प्रोत्साहन देण्यासाटीं 'प्रतिष्ठान' नांवाचें मासिक काढण्यांत येत आहे.

बाल साहित्य निर्मितीच्या दृष्टीनें कांहीं प्रकाशनें निघालीं. उत्तेजनासाठीं स्पर्धाहि ठेवण्यांत आली.

संशोधन आणि ऐतिहासिक महत्त्वाचीं पुढील प्रकाशनें परिषदेनें हातीं घेतलीं.

१. दासोपंतांची पासोडी. २. डॉ. ना. गो. नांदापूरकर यांचा 'मुक्त-मयूर महाभारताचा तौलनिक अभ्यास' हा प्रबंध. ३. कवि रामसुतात्मज कृत 'चंद्रहास्य कथा' ४. कवि कृष्णमुनि विराटदेशे कृत 'रुक्मिणी स्वयंवर'

मराठी वाङ्मयाच्या अभ्यासाच्या दृष्टीनें 'मोरोपंती आख्यानें' हें पुस्तक प्रकाशित करण्यांत आलें.

मराठवाड्यांतील प्रसिद्ध साहित्यिक कै. बी. रघुनाथ यांचा 'पुन्हां नभाच्या लाल कडा' हा कवितासंग्रह नुकताच प्रसिद्ध झाला.

नवोदित साहित्यिकांना पुरस्कार आणि प्रोत्साहन देण्याच्या दृष्टीनें प्रकाशन कार्यांत आर्थिक साह्य देऊन पुरस्कृत प्रकाशनें करण्याचें परिषदेनें ठरविलें.

प्रस्तुत 'तृणाची वेदना' हा श्री. तु. शं. कुळकर्णी यांचा लघुकथासंग्रह या पुरस्कृत मालेंतील पहिलें प्रकाशन आहे.

श्री. तु. शं कुळकर्णी यांची कलादृष्टि, स्वतंत्र शैली आणि सापेक्षिप्त अभ्यास यांचा प्रत्यय या संग्रहांतून निश्चितपणें येईल. हा संग्रह श्री. तु. शं. कुळकर्णी यांच्या संबंधीं पुष्कळच अपेक्षा निर्माण करील.

प्रस्तुत प्रकाशनास अनेकांनीं आपल्यापारि सहकार्य केलें आहे. प्रकाशन समितीनें नियोजित केलेलें परीक्षक मंडळ यांच्या सहकार्याबद्दल, तसेंच जयहिंद प्रेसच्या संचालकांनीं वेळशीर काम करून दिल्याबद्दल, धन्यवाद.

— प्रकाशक

## – कथा लेखक तु. शं. कुळकर्णी

"तृणाची वेदना" या कथासंग्रहाचा परिचय करून देतांना मनःस्थिति थोडीशी गोंधळल्यासारखी झाली आहे. कथासंग्रहाचा लेखक आणि मी, दोघेंहि आपापल्या क्षेत्रांत नवखे आहोंत. मराठवाड्यांतील यापूर्वीचा प्रकाशनांचा अनुभव फारसा उत्साहदायी नाहीं. या स्थितींतहि आहे त्याबाबत आमची कोणतीच तक्रार नाहीं. कारण तक्रारीचा कांहीं उपयोग नाहीं. आणि दुसरें म्हणजे या अनुभवांनीं आम्ही विचलितहि झालेलों नाहीं. पोलीस–ॲक्शन नंतर नियमित प्रसिद्ध होणारें "मराठवाडा" हें अर्धसाप्ताहिक आणि या दोन वर्षांत प्रतिष्ठा पावलेलें "प्रतिष्ठान" हें मासिक, हीं दोन साधनें इकडील लेखकांसाठीं निर्माण झालीं– व यामुळें या सात-आठ वर्षांत बरीच लेखक मंडळी पुढें येऊं शकली.

१९४८ नंतर पुढें आलेल्या लघुकथा लेखकांत तु. शं. कुळकर्णी याचा क्रमांक बराच वरचा लागेल. जीवनदर्शन आणि स्वभाव रेखन या कसोट्यांवर तोच सर्वांत जास्त यशस्वी लेखक ठरावा.

तु. शं. कुळकर्णीला त्याचे मित्र मामा या नांवानें हांक मारतात. एका भर दुपारीं माझ्या एका मित्रानें– सदाशिव कहाळेकरनें– मामाचा परिचय करून देण्याचा प्रयत्न केला. या सुमारास 'मराठवाड्यां' तून त्याचें लिखाण क्रमशः प्रसिद्ध होत होतें. त्याचा स्वभाव थोडासा तिरसट आणि एकलकोंडा असा, तर मी

होतां होईतों साहित्यिकाच्या जातीला दोन पावलें दूरच ठेवणारा— तेव्हां ओळख वाढेल अशी दोघांचीहि अपेक्षा नव्हती. योगायोग मात्र निराळे होतें, बरेंच दिवसपर्यंत 'हरी मस्जीद' च्या पुढें कॅप्सटन्‌चे झुरक्यावर झुरके ओढीत, उभा असलेला तो दिसे. परंतु आम्ही एकमेकाला टाळीत होतों.

एके दिवशीं मनांत एक आणि जनांत भलताच हेतू धारण करून मी 'साहित्य-प्राज्ञ' च्या वर्गांत पाऊल टाकलें आणि आम्हीं वर्ग-मित्र ठरलों. तरीहि औपचारिकतेच्या पलिकडे सरकण्याचें दोघेंहि टाळीत होतों!

कांहीं दिवसांनंतर अचानकच उस्मानिया हॉस्पिटल्‌मधून त्याचा निरोप आला. मोटार अपघातांत तो सांपडला होता म्हणून वर्गांत त्याला उपस्थित राहतां येणार नव्हतें. आणि मी एक चूक केली— ती चूक आतां नेहमींच भोंवते आहे. मी त्याच्या भेटीस गेलों! मला पाहतांच उठण्यासाठीं तो धडपडला, पण त्याला तें जमलें नाहीं. त्याहि वेळीं त्याच्या हातांत एक पुस्तक होतें.

"मामा तुम्ही इथें कसें?" क्षणभर तो माझ्याकडे नुसता पाहातच राहिला, आणि मग कोण जाणे कसें, एक तुच्छ स्मित त्याच्या चेहऱ्यावर झळकलें. त्यानें प्रश्नाचें उत्तर अध्यावरच सोडून दिलें. आम्हीं मग मोपाँसाच्या कथा वाङ्मयावरच बोलत बसलों. दवाखान्यांत प्रारंभ झालेली ती साहित्यचर्चा दिवसेंदिवस केशाकर्षक झाली पण संपली नाहीं. आणि जें या तीन वर्षांत झालें नाहीं तें यापुढें होण्याची शक्यताहि उरली नाहीं. औपचारिकतेच्या सीमा केव्हा ओलांडल्या गेल्या हें दोघांनाहिं कळलें नाहीं.

प्रथम परिचयांतच्च दोन गोष्टी स्पष्ट झाल्या. एक म्हणजे, त्याचें वाचनाचें वेड आणि दुसरी त्याची विलक्षण आत्मनिष्ठा. त्यामुळें तो एकांत प्रिय बनला आहे— व दुःखें पचविण्याची त्याला संवय झाली आहे. जीवनांत त्याला फारसा जिव्हाळा कधींच प्राप्त झाला नाहीं. अपयशाचे कडू घोटच नित्य वाट्याला आल्यामुळें, त्याची कुरकूर आतां संपली आहे. एका अर्थी तो विरागी बनला आहे. षड्रिपूंचा पराभव करून वासनांचा लय झालेला, निर्मम आणि निरहंकार विरागी, अर्थातच्च मला अभिप्रेत नाहीं. कलावंत हा ममत्वपूर्ण आणि अहंकारीच्च हवा. पण त्याच्याहि कांहीं परी आहेत. मामाचा संकोची आणि एकलकोंडा स्वभाव त्याला कुरकुरूं देत नाहीं. वेदनांची मनोमन चर्वणा करणें हाच अशा माणसांचा एक नवा स्वभाव होतो— तसाच्च मामाचाहि झाला आहे. निर्भेळ आनंद आणि निर्भेळ दुःख यांची शक्यता त्याच्यासाठीं कमी झाली आहे. तो या दोन्हींची वांछाहि करत नाहीं. परंतु याहि अवस्थेंत त्याचें संवेदनाक्षम मन साध्यासुध्या गोष्टींनीं विलक्षण बेचैन होते, व यामुळें त्याच्या प्रतिक्रिया उत्कट राहतात. जसजसें खोलांत शिरावें तसतसें त्याचें व्यक्तिमत्व गुंतागुंतीचें आणि गिचमिड झालेलें आढळून येतें— आणि यांतच त्याच्या लेखनांतील खुमारीचें एक कारण दडलेलें आहे.

ही वेदनांची चर्वणा त्याला एकीकडे हें जीवन तुच्छ आहे— घृणास्पद आहे, या तार्किक निर्णयावर आणून सोडते. आणि मग पुष्कळशा सरळ गोष्टी सुद्धां यांत्रिकतेनें, व बिभत्सवासनामयतेनें आवृत झाल्या आहेत असें त्याला वाटतें. आपण विफल आहों असा एक तार्किक गैरसमजहि त्याच्या अंतःकरणांत घर करून आहे.

निराशा आणि विफलता यांत मी थोडा फरक करतो. आपल्या वैयक्तिक जीवनांत जीं मूल्यें आपण प्राप्त करून घेऊं शकलों नाहींत पण ज्यांच्या चांगुलपणाबाबत आणि सामाजिक उपयुक्ततेबाबत मात्र आपण निःशंक असतों; निराशा ही त्या पराभवाची परिणति असते. विफलतेचा प्रांत यापेक्षां निराळा आहे. जें मिळविण्यासाठीं आपण झुजलों, आणि पराभूत झालों तें मिळवण्याइतकें आपलें सामर्थ्य नव्हतें, इथून विफलतेचा प्रांत आरंभ होतो. तें पचविण्याची आपल्यांत कुवत नव्हती म्हणून जें झालें तें योग्य झालें, या बिंदूला स्पर्श करीत विफलतेची रेखा जें मिळवण्यासाठीं आपण झुंजलों तें झुंजण्याच्या लायकीचें नव्हतें या रेखेला येऊन मिळते. यामुळें विफलता, द्रष्टा, दृश्य, आणि दर्शन हें सारे कांहीं मिथ्या असून ब्रह्म कांहीं निराळेच आहे याचा साक्षात्कार झालेल्या स्थितप्रज्ञासारखी असते. विफलतेच्या बुडाशीं गृहीत जीवन मूल्यांचा तार्किक पोलपणा वसत असल्यामुळें शून्य वाद्यांचे आणि विफलांचे प्रांत परस्पर संमिश्र असतात. विफल हा स्वतःचीं नवींमूल्यें निर्माण करणारा एक फसलेला तत्त्वज्ञ असतो. कलाकृतींचा आधार असल्या विफल व्यक्तिमत्वाचा असूंच शकत नाहीं. आजकाल आपण विफल आहों हें एक कलामूल्य झाल्यामुळें या प्रश्नाचा थोडा विस्तार करावा लागला.

"छाया" या लघुकथेंतील, लग्ना आधीं एकमुखी असणाऱ्या मायलेकी, मुलीचें लग्न होतांच जेव्हां नित्य कुरकुरूं लागतात, आणि त्या कुरबुरीला फारसें कारणहि असत नाहीं. ही घटना मामाला बेचैन करते. या घटनेच्या बुडाशीं असलेली कारण परंपरा शोध-

ण्याचा तो प्रयत्न करतो. फ्राईड त्याला एक नवीच कारण मीमांसा सुचवतो, आणि त्या आधारें आपल्या मानस पुत्रांच्या जीवनाचा एक वासनामय धागादोरा हातीं येतांच; तुच्छतेनें तो त्यांच्या जीवनांतील घटना व सुखदुःखें रंगवूं लागतो. अशावेळीं आपण तुच्छतावादी आहों हें तो गृहीत धरतों. परंतु ही सारी तुच्छता आणि विफलता वरवरची असते.

एकांतप्रिय माणसें जेव्हां एखाद्या आकर्षणांत सांपडतात तेव्हां त्याचा वेगहि विलक्षण तीव्र असतो. अशा तीव्र आकर्षणांच्या झोक्यावर हिंदोळतांना मामाचें वाङ्मयीन व्यक्तिमत्व समृद्धहि झालें आहे आणि लौकिक जीवन उध्वस्तहि झालें आहे. बाह्य जीवन निरखीत असतांना 'हें–तें तुच्छ आहे' असा विचार करणारी हींच माणसें जेव्हां आत्मनिष्ठ होतात तेव्हां सौंदर्यवादाच्या डोहांत गुदमरेपर्यंत बुडतात. भावनांचें अधिष्ठान असणारी सारीं उदात्त व कोमल मूल्यें हीं आपल्या पात्रांना अनुभवतांना दाखवतात. या तुच्छ जगांतील क्षुद्र जीवन व्यापार जगणें हीच मामा नामक तुच्छ जिवाची मूल भावना असती तर "स्मृति" सारखी नितांत रम्य कथा आवतरलीच नसती.

मामाच्या सौंदर्यवादी वृत्तीचें प्रतिबिंब "स्मृति" या कथेंत बघावयास मिळतें. या कथेच्या नायकांत ही वृत्ती प्रकर्षानें प्रकट झालेली आहे. "पोरी फसवतात" हें त्या नायकाला माहीत आहे. अपयश त्याच्याहि नशिबीं लिहिलेलेंच आहे– परंतु तें वाछनीय होतें. तें नैराश्य उबदार होतें. फसवलें गेल्याच्या विदारक जाणिवेंपेक्षां 'मी तिला फसवलें नाहीं.' या भूमिकेचीच विरल धुंदी त्याच्या मनांत

उरतें. अंतरंगांतली सारी उदारता अशा वेळीं उसळून वर येते, आणि चांचल्य हा तिचा गुन्हा नसून स्वभाव होता असें समर्थन तो नायक करावयास लागतो. नवप्रादुर्भूत प्रीतीच्या अग्नींत जळून भाजून जाण्याला तो नायक उत्सुक आहे, पण या बेभान अवस्थेंतहि एका विचित्र अलिप्ततेचा त्याला आभास होतों आहे. जन्मोजन्मींच्या अपूर्ण आशा सफल होत आहेत, या प्रकारचा विचार करत असतांना त्याचें मन त्याला संतत जाणीव देते कीं 'हें सारें खोटें आहे'— सहस्रावधी वर्षांच्या मानवी जीवनांत हजारोंनीं हजारोंवेळीं हें वाक्य उच्चारलेलें असतें. हें वाक्य मचुळ आणि गुळगुळीत झालेलें आहे. याहि पायरीवर प्रीतीचा डाव विस्कटला जावा ही सुद्धां एक जुनीच गोष्ट आहे. प्रीतीचा यशस्वी शेवट झाला असतां, तरीहि तो नायक साशंकच राहिला असता. अपयशांतहि फसविणाऱ्या हतभागिनीचें समर्थन करण्यासाठीं तो बद्ध परिकर आहे. "स्मृति" या मूड मागील अनुभव घेणारें मन तुच्छतावादी नाहीं— याचा हा पुरावा आहे. "छाया" आणि "स्मृति" या दोन कथांतील हा विरोध समजून आपण घेतला पाहिजे.

आपल्या मानसपुत्राकडे आपण घृणेनें पाहात आहों, त्याचें दर्शन घडवीत असतांना आपण त्याची क्षुद्रताहि उजेडांत आणीत आहों अशी मामाची खात्री असते. पण ही खात्री बाळगतांना त्यानें स्वतःच स्वतःला फसवलें आहे. बुद्धिवादाचा, व्यवहारीपणाचा मुखवटा घालून निर्विकारपणें या किटाणूंचें जीवनदर्शन आणि मनोविश्लेषण करण्यासाठीं तो आपली लेखणी उचलतो. याचवेळीं एका कोपऱ्यांत अनुकंपा आणि कींव अश्रूंचें रूप घेऊन सांठत

असते. एक क्षण असा येतो जेव्हां त्याच्या लेखणींतून ही कींव पाझरायला लागते आणि कथा संपते. आपल्या कथांतील पात्रांवर शेवटीं सहानुभूतीचा वर्षाव झालेला आहे, तोहि नकळत अपरिहार्य-पणें झाला आहे, हें कबूल करणें त्याला जड जाईल. "चक्र" या कथेचा जन्म बाबा अरळकरांचा उपहास करण्यासाठीं झाला. अकराव्यांदा गरोदर असणारी त्याची बायको, आपण बोलपटांतील नायक आहों या तोऱ्यानें वावरणारी चिरंजीव मंडळी, बाबा अरळकरांचा उपहास करण्यासाठीं नुसती टपून आहेत. पण त्या क्षणीं हा वैतागलेला माणूस सुद्धां उरीं फुटे पर्यंत खपून सर्वांचें ईप्सित पूर्ण करण्यासाठीं धडपडत आहे. आणि या धडपडींत आपल्या स्वतःच्या वेदना वाढवून घेत आहे— याचें आपण दर्शन घेतों तेव्हां कथा संपते. हाच प्रत्यय "खुराडें" कथा वाचतांना येतो.

खरी गोष्ट तर ही आहे कीं सहानुभूति आणि अनुकंपा हीच सर्व साहित्याची, साहित्यिकांची आणि कलावंतांची सामुग्री आहे. कला-वंताच्या मनांत असणाऱ्या या सहानुभूतीची जात मात्र निष्ठूर हवी. आपल्या मनासपुत्रांची दुःखें आणि व्रण पाहून जर त्याच्या नेत्रांच्या कडा ओलावत नसतील तर कलानिर्मिति कारागिरीचें रूप घेतें. पण या ओलावलेल्या नेत्रांनीं त्याची दृष्टि अंधूक होतां कामा नयें. नाजूक हातानें हें व्रण काळजी पूर्वक उघडून दाखवणें व त्यावर कधींच खपली बसूं न देणें हें त्याचें कार्य आहे. पुष्कळसे कलावंत हें न जमल्यामुळें आपली कला डागाळून घेतात. ही दुखरी जागा टाळून कोनहीन स्वप्नरंजनाचा डोलारा उभा करणें किंवा हें व्रण पाहून स्वतःच आक्रोश करण्यास प्रारंभ करणें हे दोन्ही मार्ग चोखाळ-

ण्याचा मोह होतच असतो. हा प्रकार मामाच्या कथांत कुठें आणि किती झाला आहे, याची मोजदाद करणें कठीण नाहीं परंतु हीं ठिकाणें अल्प आहेत. निष्ठूर सहानुभूतीची ही तारेवरील कसरत "चक्र" सारख्या कथेंत अत्यंत सफाईदार वठली आहे.

जगाच्या धर्मशाळेंत आपणच आपल्याला फसवणारें, स्वतःला तुच्छतावादी आणि व्यवहारवादी समजणारें हें वाङ्मयीन व्यक्तिमत्व अनुकंपाशील आहे. ही अनुकंपा कलावंताची असल्यामुळें निश्चित ठिकाणीं योग्य त्या प्रमामांत प्रकट होणारी, आणि निष्ठूर असल्यामुळें ऊरबडवी न झालेली अशी आहे. मात्र याची स्वतःलाच जाणीव नसल्यामुळें तें व्यक्तित्व दुभंगून गेलेलें आहे.त्याचे काहीं पदर क्वचित् प्रसंगी विसंवादी आहेत, पण मन म्हणजे भूमिति अगर आलेख नव्हे. ही संकीर्ण गिचमिड ही गुंतागुंत, हेंच अशा कलावंतांचें वैशिष्ट्य असतें. असें दुभंगलेलें व्यक्तित्व घेऊन चिडणारा, आणि त्याचवेळीं रडणारा, कठोरपणें चिरफाड करणारा परंतु त्याच क्षणीं पाझरणारा असा माझा जिवलग मित्र आपल्या या कथांतून प्रकट झाला आहे. आपल्या एका पत्राच्या शेवटीं तो लिहितो.

"हें विचित्र दुःख असे घेउन उरीं मी जगतों
गगनांतुन, घरट्यांतुन शापित मी तगमगतो–"

परिचय म्हणजे सर्वांगीण मूल्यमापन नव्हे. त्याच्या मनाचे कांहीं पदर जें सहज हातीं आले तें उलगडून एकूण गुंतागुतींतील कांहीं धागे स्पष्ट करण्याचा मी प्रयत्न केला आहे. ही उलगड करतांना मूळ गुंत्याला कांहीं निरगांठी पडण्याची हि शक्यता मला मान्य आहे.

२ ऑक्टोबर १९५५ **नरहर कुरुंदकर**

# आभार

आभाराचा उपचार पाळतांना मनःस्थिति गोंधळल्यासारखी झाली आहे, ज्या व्यक्तींचें आभार मानावयाचें आहेत त्यांच्यापैकीं अनेक जण आभारासाठीं अडलेलें नाहींत– आणि संबंध असें आहेत कीं आभार कुठल्या शद्बांनीं मानावेंत हा एक प्रश्न आहे.

डॉ. नांदापूरकरांच्या शुभेच्छा आणि आशीर्वादाबद्दल कृतज्ञतेचा भाव शद्बांनी प्रकट करतां येत नाहीं.

कथासंग्रह छापायला प्रा. भालचन्द्र कहाळेकर आणि श्री. अनंत भालेरावांनीं प्रवृत्त केलं. कथासंग्रह निघेपर्यंत त्यांनीं माझ्यासाठीं जें परिश्रम सोसलें आहेत, तें ऋण आभारानें फिटणार नाहीं.

नरहर कुरूंदकरनें प्रस्तावना लिहून फारसा उपकार केला नाहीं. मैत्रीच्या गुन्ह्याबद्दल दिली ती शिक्षा योग्य आहे, असंच कुणीहि म्हणेल. आभार मानलें नाहींत म्हणून त्याला थोडाच पश्चात्ताप होणार आहे ?

मराठवाडा साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. रा. ब. माढेकर आणि प्रकाशन समिति यांनीं काम हातीं घेऊन तें उत्साहानें संपाविलें या बद्दल मी त्यांचा आभारी आहे.

प्रा. भगवन्त देशमुख, श्री. कानिटकर या मंडळींनी हस्तलिखित वाचून ज्या मोलाच्या सूचना केल्या, त्यांचा मी व्यक्तिशः ऋणी आहे.

वसंत देशपांडे, गोपाळ काळे, सदाशिव कहाळेकर सखाराम तुपेकर वामन देवडीकर इ.अनेक मित्रांच्या सक्रिय सहाय्याचा नुसताच उल्लेख करतों. श्री. भगवान भालेराव यांनीं दिलेल्या चित्राबद्दल आभारी आहे.

संग्रहांतील कथा, रोहिणी, प्रसाद, नवीवाट, सुषमा, प्रतिष्ठान आणि कथासृष्टि (पाक्षिक) यांतून प्रसिद्ध झालेल्या आहेत. या मासिकांच्या संपादक मित्रांनीं पुनर्मुद्रणाची परवानगी दिल्याबद्दल त्यांचा आभारी आहे.

– तु. शं.

# अनुक्रमणिका

# १. छाया

रात्रीचा काळा रंग सृष्टीचा कलाकार हळूं हातानें पुसावयास लागला आणि सर्व रात्रभर आपल्या मऊ अंथरुणांत या कुशीवरून त्या कुशीवर करण्यांत वेळ घालविलेल्या शकुंतलाबाईनीं आपले अधू डोळे घड्याळा-कडे वळविले. फक्त साडेपांचच झालें होतें! त्यांना याचें समाधान वाटलें. तसा सकाळ होण्यास अद्याप बराच अवधि होता.

त्यांच्या नव्याच लग्न झालेल्या मुलीनें, रात्रीं आपल्या पतीभोंवतीं आवळलेलें पाश अद्याप सैल केले नव्हते– आतां तर ती जास्तच बिल-गून झोपली असेल हा विचार शकुंतलाबाईंच्या मनांत आला अन् किंचित् तिरस्कारानें त्यांनीं पलीकडेच झोपलेल्या आपल्या नवऱ्याकडे बघितलें. ते हि अंथरुणांत चाळवाचाळव करीत होते, तसं मग त्यांच्या कुशींत शिरावं नि चांगला सूर्य वर येईपर्यंत पडून राहवं असं त्यांना वाटलं– कांहीं वर्षांपूर्वीची त्यांची तीं संवयच होती!

लग्नानंतर एकाद दुसरं वर्षच त्या पतीशेजारीं झोपल्या असतील पण पहिलं बाळंतपण झाल्याबरोबर दोन अंथरुणें झालीं, त्यांची विनोद ही सर्वांत वडील मुलगी. यंदाच तिला कुठं बावीसावं लागलं, गेल्याच वर्षी तिचें लग्न झालें होतें, म्हणजे– बावीस वर्षं झालीं कीं त्या गोष्टीला? किती नकळतपणें काळ हातांतून निसटला होता! विनोद नंतर दोन वर्षांनीं प्रभा झाली आणि तिच्या पाठचीं दोन जन्मल्याबरोबर दिवंगत झालीं होतीं, पांचव्या खेपेस मुलगा व्हावा अशी त्यांची मनस्वी इच्छा

होती पण त्याहि खेपेस त्यांना मुलगीच झाली! तीच आठ वर्षांची सिंधू त्यांना अगदीं बिलगून झोपली होती– हल्ली आईजवळ झोपण्याचा तिलाच अधिकार होता, वात्सल्यानें त्यांनीं तिच्या पाठीवरून हळूंच हात फिरविला, आणि नंतर त्यांना एकदम राग आला! विनोद प्रभा, सिंधू– यांच्या जन्मामुळेंच त्या आपल्या पतीपासून– रामभाऊ पासून वेगळ्या झाल्या होत्या, त्यांचं तारुण्य, सौंदर्य सारं सारं या मुलींनी हिरावून घेतलं, नाहींतर पूर्वींचं आयुष्य किती सुखावह होतं? लग्नाच्या वेळीं त्या वीस वर्षांच्या होत्या आणि हीं पंचवीस वर्षे, वयाची अवघी पंचेचाळीस वर्षे संपलीं होतीं. या एकामागें एक झालेल्या बाळंतपणामुळें त्यांचं सारं शरीर ढासळलं होतं. आजारपणामुळं त्या किडकिडीत झाल्या होत्या. पूर्वीचें लांबसडक केंस जाऊन तिथें सुपारी एवढा अंबाडा आला होता, त्यांतहि कित्येक केंस पिकले होते, आणि तोंडांत चार पांचच दांत शिल्लक होते!

त्या उठून स्वयंपाकगृहांत आल्या, व बंबांतील पाण्यानें त्यांनीं चूळ भरली आणि स्टोव्हला काकडा लावला. रामभाऊहि अंथरुणांतून ताडकन उठून बसले, शकुंतलाबाईनी त्यांना एक चहाचा कप आणून दिला व दुसरा एक कप घेऊन स्वतः पलीकडील खुर्चीवर बसल्या. विनोद, प्रभा, सिंधू त्यांचा दूरचा भाचा सदू, नुकतेच आलेलें वसंतराव जांवई, ह्यांच्यापैकीं कुणीच जागं झालं नव्हतं. पतीपत्नींनीं चहा संपविला–- दोघेंहि एकमेकांकडे चमत्कारिकपणें बघावयास लागलीं. बोलण्यास कुठलाच विषय सांपडेना, काय हलाखीची स्थिति? लग्न झालं त्या वर्षी त्या अगदीं सीलोन रेडिओसारख्या सतत बडबडत असायच्या! नवीं मनोराज्यें, पातळें, सिनेमा नि नाना भानगडी– या सर्वांसाठीं तेव्हां दिवस पुरवयाचा नाहीं– भगिनी मंडळाचे कार्यक्रम, पार्ट्यां आणि इतर फालतू समारंभामुळें त्यांना केव्हां केव्हां रात्रहि होत असे. रामभाऊंची वकिली, त्यांच्या कोर्टकचेऱ्यांच्या गप्पा, थट्टा, प्रेमळ

रुसणीं फुगणीं, तक्रारी गाऱ्हाणीं— काय अजब असतात तारुण्यांतले दिवस! तिथं घुमेपणानें बसणं असह्य झाल्यामुळें त्या परत स्वयंपाक घरांत गेल्या आणि रामभाऊंनीं नकळत सुटकेचा निःश्वास सोडला! अजूनहि सूर्य फारसा वर आला नव्हता, परंतु दिशा उजळल्या होत्या. खालील सडकेवरील विजेचे दिवे विझले होते आणि म्युनिसिपालिटीच्या स्त्रिया सडक झाडीत होत्या, किरकोळ दूधवाले भय्ये आणि सकाळचीं पेपर्स विकणारीं पोरें फिरावयास लागलीं होतीं.

रामभाऊंनीं कालचा 'टाईम्स' चा अंक बाहेर काढला आणि ते वाचण्याचा प्रयत्न करूं लागले. पंधराचौस मिनिटें पानें इकडेतिकडे केल्यानंतर, त्यांनीं पेपर टेबलावर भिरकावला आणि मग व्यावसायिक पत्रें लिहिण्यास प्रारंभ केला.

शकुंतलाबाई भाजीची टोपली घेऊन दिवाणखान्यांत आल्या आणि गोवाऱ्याच्या शेंगा निवडूं लागल्या. कांहीं तरी बोलावं म्हणून त्या उद्‌गारल्या "आपल्या त्या— ह्यांना पत्र घातलं का हो?"

रामभाऊंच्या चेहेऱ्यावर प्रश्नचिन्ह उमटलं. त्या कुणाबद्दल विचारत आहेत याची त्यांना कल्पना येईना, कांहींतरी उत्तर देणं आवश्यक आहे, असं वाटल्यावरून तेहि म्हणाले, "आपल्या त्या ह्यांना होय? कालच पाठवलं!"

शकुंतलाबाईंना पतीचा अत्यंत राग आला. विचारलेल्या अवास्तव प्रश्नाचं त्यांनीं उत्तर दिलं हें त्यांना आवडलं नाहीं. उलट त्यांनीं कांहींतरी खोटं सांगावं अशी त्यांची अपेक्षा होती.. आणि त्यानंतर— हो! त्यानंतर काय करावं हाहि प्रश्नच होता? पण त्यांना वाटलं आपण या तरी कारणाहून नवऱ्याला खूप बोललों असतों, त्यांच्याबरोबर भांडलों असतों, त्यांच्यावर चिडलों असतों आणि मग सबंध दिवसभर घरांत धुसफूस करतां येणं शक्य होतं— साऱ्या मंडळीवर रागवतां आलं असतं, त्या मुळीं स्वयंपाकालाच बसल्या नसत्या! तशीं मग साऱ्या

मुलींची तोंडें चिमणीएवढीं झालीं असतीं, लहानगी सिंधू गळ्यांत पडलीं असतीं. सर्वांनीं त्यांची खुशामत केली असती. आणि मग एवढ्या खटाटोपानंतर त्यांना समाधान मिळालं असतं!

पण वार्धक्याच्या या छायेबरोबरच मानासिक दुःखहि त्यांच्या जीवनावर टोळधाडीसारखं झांकळून येत होतं. नाहींतरी हल्ली रामभाऊ अगदीं एखाद्या शेळपटासारखें वागावयास लागले आहेत, हें त्यांना कळून चुकलं. पूर्वी तेहि भांडणाला हार जाणारें नव्हतें. तेव्हांची तीं भांडणें आतां परत यावींत म्हणजे पूर्वींची मौज कायम राहील– ही त्यांची अपेक्षा– ही त्यांची तळमळ– शेजारच्या गल्लींत कोंबडा आरवला आणि शकुंतलाबाईंना वाटलं, तो ओरडून आपला निषेध करीत आहे. ह्या विचारानें त्या अत्यंत अस्वस्थ झाल्या. आकसून बसलेल्या रामभाऊकडे त्यांनी भेदक दृष्टीनें बघितलं. त्या पुन्हां कांहींतरी बोलणार हें रामभाऊंनी ताडलं. आपल्या मायनस नंबरच्या जाड्या लेन्सेस मधून त्यांनीं एकच अर्थपूर्ण कटाक्ष आपल्या पत्नीकडे टाकला. "यंदा प्रभाला अठरावं वर्ष लागलं आहे. तिच्या लग्नासंबंधीं विचार नको कां करायला? कांहीं स्थळं हेरून ठेवलींत कां? त्या डॉ. देशपांडेना विचारतो म्हणाला होता, यंदाच त्यांचा मुलगा इंजिनिअर झाला आहे म्हणे!" शकुंतलाबाई.

रामभाऊ नुसतं "हूं." म्हणून गप्प झाले, आणि मग एकाएकीच उसळले," सकाळपासून बघतो आहे मी–काय कटकट लावलीस ग? शांतता मिळूंच देत नाहीं तुम्ही लोक. एवढ्या सकाळीं अजून लोक जागेदेखील झाले नाहींत तर तुझ्या लग्नाच्या गप्पा निघाल्या, मला इतर कांहीं कामें नाहींत असं वाटलं का तुला?" पण त्यांना काय वाटलं कुणास माहीत–ते एकदम गप्प झाले. आपण एवढ्या चिडखोरपणें उत्तर द्यावयास नको होतं याची त्यांना जाणीव झाली. गेल्या अनेक दिवसांपासून त्यांचा स्वभाव नकळतपणेंच चिडखोर बनावयास

लागला होता. आतांशाच असं कां वाटावयास लागलं आहे– आपली वर्तणूक चमत्कारिक कां बनत आहे या प्रश्नाचीं उत्तरें त्यांना आपल्या नित्याच्या जीवनांत सांपडत नव्हतीं. अन् मग अचानकपणेंच त्यांना कोर्टांतील एका मित्राचं वाक्य आठवलं. कुठल्यातरी केसमध्यें त्यांच्या विरुद्ध बाजूला एक तरुण वकील होता आणि केस त्यानं मोठ्या कौशल्यानें जिंकली होती. त्यांच्या संपूर्ण जीवनांतील तो एक जबरदस्त पराजय होता. आणि त्याचं त्यांना मनस्वी वाईट वाटलं. त्याचवेळीं तो मित्र म्हणाला होता "रामभाऊ आपली सद्दी संपली. तरुण पिढीचं राज्य आहे आतां, किती दिवस राहिले आहेत या क्षेत्रांत आपले?"

त्या प्रसंगाच्या आठवणीनें त्यांनीं हळूंच सुस्कारा सोडला. शकुंतलाबाई बोलण्यासाठीं सज्ज झाल्या, पण एवढ्यांत घरांतील अर्धीअधिक मंडळी जागी झाली, या सर्वांसमोर कुरबूर करणें शक्य नाहीं या विचारानें त्या ताडकन उठल्या अन् परत स्वयंपाकघरांत गेल्या. दुसऱ्या चहाची वेळ झाली होती, त्यांनी परत स्टोव्ह पेटवला. गड्यानें नुकताच बंब पेटवला होता आणि तो झाडलोट करीत होता. सिंधू अद्यापहि झोपलेलीच होती–तिला त्यांनीं खसदिशीं अंथरुणांतून ओढलं– विनोद आपल्या खोली बाहेर आला आणि हळूंहळूं सारी मंडळी चहासाठीं स्वयंपाकघरांत येऊन बसलीं.

त्या यांत्रिकपणें आपलीं नित्याचीं कामें पार पाडावयास लागल्या, चहा संपल्याबरोबर त्यांनीं स्नान आटोपलं. रामभाऊंच्या धोतराच्या निऱ्या करून तें स्नानगृहांत ठेवलें, रामभाऊंनीहि स्नान आटोपलं–मग तिन्हीं मुलींनींहि स्नानें केलीं, शकुंतलाबाई स्वयंपाकाला लागल्या आणि रामभाऊ देवघरांत शिरले– गेल्या कांहीं दिवसापासून धूळ खात पडलेल्या देवांचा त्यांनीं जिर्णोद्धार केला होता! हल्लीं त्यांना पूजाअर्चा करण्यांत आनंद मिळावयास लागला होता. साडेनवाला सारी मंडळी जेवावयास बसली आणि मग मुलामुलींची शाळाकॉलेजाची घाई सुरूं

झाली. सिंधूची पुस्तकें सांपडेनात म्हणून तिनें घरांत गोंधळ घातला आणि एकदांची कशीबशी तीहि प्रभाबरोबर बाहेर पडली. दहा वाजतां रामभाऊंनीं आपला कचेरीचा पोषाख केला आणि तेहि घराबाहेर पडले. सदूहि फॅशनेबल कपडे करून कॉलेजला गेला— आतां शेवटीं तीनच माणसें घरांत राहिलीं. त्या स्वतः, विनोद आणि जांवईबापू. त्या मायलेकी सर्वांत शेवटीं जेवावयास बसल्या. विनोद स्वयंपाकाविषयीं उगीच नाक मुरडावयास लागली. "भाजी आणि आमटी किती अळणी केलीस ग? चटणीला मीठ किती जास्त पडलं आहे!" तिच्या या टीकेनें शकुंतलाबाईचा अहंकार दुखावला. त्याहि चिडल्या— आजपर्यंत त्यांच्या स्वयंपाकाला कुणी कधीं नांव ठेवलेलं त्यांच्या स्मरणांत नव्हतं! नाहींतरी हल्लींच्या पोरी जरा उर्मटच झाल्या आहेत, या जाणिवेनें त्या म्हणाल्या "हो बरं बाईसाहेब! आतां तूंच शिकवणारी आली आहेस मोठी? आमचं सारं आयुष्य जसं कांहीं खेळण्यांतच घालवलं आहे आम्ही? संध्याकाळीं करून दाखव ना स्वयंपाक, मोठी सुग्रण आहेस तर?"

ती आंचवून नाकाचा शेंडा उडवीत आपल्या खोलीकडे चालती झाली आणि शकुंतलाबाईनीं आपला सारा राग जवळील भांड्या-कुंड्यावर काढला. मुलीनं जवळ बसून 'काय हवं— नको' विचारावं अशी त्यांची अपेक्षा होती पण आजच्या तरूणतरुणींना माणूसकीच राहिली नाहीं या विचारानें त्यांचा संताप अनावर झाला. आपल्या प्रेमाच्या माणसांबद्दल कोण ही अनास्था? त्यांना आपले पूर्वीचे दिवस स्मरले. किती माया होती, त्यांना सासर माहेरच्या माणसांबद्दल! सासूचंदेखील त्यांच्यावर असंच प्रेम होतं. आईला तर त्यांच्याविषयीं प्रेम असणं स्वाभाविकच होतं, आणि शिवाय त्यांची वागणूकहि तशीच समंजसपणाची होती! माहेरी गेलं म्हणजे त्या आजच्या मुलीसारख्या आरामानें बसत नसत, घरची सारीं कामें त्या आवडीनें करावयाच्या,

तशीं त्यांना सारी परिस्थिती अनुकूल होती; वडील कुठल्यातरी मोठ्या हुद्यावर होते, घरीं भरपूर नोकरचाकर असावयाचे, अशा श्रीमंतींत असून देखील त्या ऐदी नव्हत्या. गृहकृत्यांतील साऱ्या शिस्ती त्यांच्या आईनें कटाक्षानें त्यांना लावून दिल्या होत्या ! आणि आज त्यांच्याच मुलीं– अवघ्या एका पिढीच्या वागणूकींत किती क्रांति झाली होती ?

आणि मग त्यांना वाटलं हीं आपलींच चूक आहे. लाडांत वाढल्या मुळें ह्या मुली असें मिरे वाटावयास लागल्या आहेत, तसा मग त्यांनीं निश्चय केला कीं यापुढें आपण मुलींचे लाड करावयाचा नाहीं. बाकीच्या दोन मुलींना तरी शिस्त लावावयाची ! कडक वर्तणूक ठेवावयाची. स्वयंपाक घरांतील आवराआवर करण्यांत अकरा वाजले, आणि विनोद बाहेर येऊन हळूंच म्हणाली, "आई ! आम्ही दोघे किनई मॉर्निंग शो ला जात आहोत बरं कां? तिनं बाहेर जाण्याची केव्हांच तयारी केली होती, जार्जेटची फिक्कट निळी साडी, गुलाबी रंगाचा सॅटीनचा ब्लॉऊज, मनीपर्स– तिचा तो एकंदर अवतार बघून त्यांच्या कपाळावर आंठ्या दृगोचर झाल्या !

जांवईबापू विनोदच्या हातांत हात घालून घरा बाहेर चालते झाले आणि शकुंतलाबाई हें दृश्य बघतच राहिल्या ! वास्तविक त्यांना कौतुक वाटावयास पाहिजे होतं, तसं त्यांचं वयच झालं होतं. परंतु कुठेंतरी, कांहीं तरी, खटकत होतं, स्वभावांतली एक बाजू विचित्र झाली होती ! त्यांना आपलं तारुण्य आठवलं. त्यावेळचा सारा अवखळपणा आठवला, शाळेंतले दिवस कादंबऱ्या, नाटकें, त्याप्रमाणें एकवेळ करून बघितलेला प्रेमाचा प्रयोग– काय बरें त्याचं नांव होतं ? जीर्ण स्मृतीला त्यांनी थोडं अधिक ताणलं, एका, तरुणाची अस्पष्ट आकृति त्यांच्या डोळ्यापुढें उभी राहिली, प्रभाकर त्याचं नांव होतं– त्यांच्या शेजारीच तो राहात असे– दिसायला अत्यंत सुंदर होता. त्याच्या त्या भरदार शरीरयष्टीवर आणि तीक्ष्ण बुद्धिमत्तेवर त्या भाळल्या होत्या. त्याला किती

काव्यांनी ओथंबलेली प्रेमपत्रें त्यांनी पाठवलीं होतीं! त्यानंहि सर्वांची उत्तरें दिलीं होतीं. पण तें सारं प्रकरण अचानकच कुठंतरी फिसकटलं. त्यांनीं तीं पत्रें आपल्या बॅगेच्या अगदीं तळाशीं लपवून ठेवली होतीं– गेल्या अनेक वर्षांत तीं बघितलींहि नव्हतीं. आज त्यांची तीव्रतेनें आठवण झाली आणि त्या आपल्या खोलींत गेल्या, बॅग उघडून पत्रांचा तो गठ्ठा बाहेर काढला आणि आधाशासारखा वाचण्याचा त्यांनी प्रयत्न केला. त्यांचीं अक्षरें फिकट झालीं होतीं. त्यांना तीं नीट वाचतां देखील येईनात– जीं पत्रें त्यांनीं एकेकाळीं मुखपाठ केलीं, भावनेच्या टाकानें हृदयावर अक्षरशः लिहून ठेवलीं होतीं, तीं सारीं काळाच्या रबरानें पुसली गेलीं होतीं. तारुण्यांतला प्रणयाचा उन्माद, सौंदर्याची मस्ती– साऱ्या गोष्टी त्यांना आठवावयास लागल्या आणि मग त्या स्वतःवरच चिडल्या, त्यांना स्वतःचीच लाज वाटली! पत्रांचा तो सारा गठ्ठा घेऊन त्या परत स्वयंपाकगृहांत आल्या आणि पेटलेल्या निखाऱ्यांत संसाराच्या होमकुंडांत, एकेकाळच्या भावनांची त्यांनी आहुति दिली! थोडावेळ धूर झाला आणि मग एकदम ज्वाला भडकली आणि पुनः सारं शांत झालं! तसा त्यांना उगाच पश्चाताप झाला! आयुष्यांतल्या गोड स्मृतींना उगीच तरी आग लावली असं त्यांना वाटावयास लागलं!

प्रक्षुब्ध मनःस्थितींत त्यांनीं सारीं कामें आटोपलीं, आणि घड्याळा-कडे बघितलं. आतांच कुठें नुकते बारा झाले होते. मुलामुलींना शाळा-कॉलेजांतून येण्यासाठीं बराच अवकाश होता– तोपर्यंत काय करायचं? शेजारच्या मालतीबाईकडे जाऊन गप्पा मारण्याचा विचार त्यांच्या मनांत आला; पण त्यांतहि त्यांचं मन रमण्याची लक्षणें नव्हती. त्या वामकुक्षीसाठीं म्हणून पलंगावर आडव्या पडल्या. 'स्त्री' मासिकाचा अंक चाळावयास लागल्या. त्यांच्या भाच्याचं आवडतं 'रहस्यमाला' वाङ्मयहि तिथंच पडलं होतं– तेंहि त्यांनीं चाळलं, पण छेः! कांहीं वाचावसं वाटेना– त्यांनीं झोपण्याचा प्रयत्न, केला, व त्या डोळे मिटून

उगीच तरी पडून राहिल्या, एवढयांत एकतारी हातांत घेऊन एक आंधळा भिकारी आपल्यापेक्षां पुष्कळ तरुण असलेल्या बायको बरोबर वाडयांत शिरला. तो आपल्या भसाडया आवाजांत मीराचं भजन आळवीत होता. "तेरी मै तो प्रेम दिवानी मेरा दर्द न जाने कोयी–" एकदम त्यांना कुठली स्फूर्ति आली कुणास माहीत? त्या गॅलरींत येऊन उभ्या राहिल्या. किती सुंदर काव्य होतं तें! 'प्रेमवेडी'– त्यांनी नकळत त्या भिकारणीकडे बघितलं, मळक्या, विटक्या आणि फाटक्या पातळांत तिनं आपलं शरीर कसंबसं झाकलं होतं, पण आंधळया नवऱ्याबरोबरहि ती किती एकनिष्ठपणें वागत होती! आपणहि रामभाऊंचा हात असाच हातांत घ्यावा अन् हेंच भजन गात, त्रिभुवनांत फिरावं असा कांहींसा विचार त्यांच्या मनांत डोकावला!

भिकाऱ्यांना कांहींतरी देऊन त्यांनीं वाटेला लावलं आणि पुन्हां त्या एकाकी झाल्या! चमत्कारिक विचार सारखें त्यांच्या मनांत यावयास लागले आणि भेडसावयास लागलें. क्षणैक उच्छृंखल व्हावं आणि वाटेल तें करावं असं त्यांना वाटावयास लागलं, पण शरीर मात्र जागचं हलण्यास देखील तयार नव्हतं!

दोन वाजतां विनोद आपल्या पतिराजासह हंसत खिदळत वर आली, आणि त्यांची तंद्री भंगली, त्या उठून बसल्या आणि विनोदला अगदीं उत्सुकतेनें प्रश्न विचारला " कसा होता ग पिक्चर? ".

' फारच सुंदर होता ग आई! तुला ती सॅमसन डिलाईलाची गोष्ट माहित आहे ना? तोच पिक्चर बघण्यास आम्ही गेलों होतों. अशी सुंदर आहे ती 'हॅडी लॅमर'– तूं बघच आई एकदां तरी." त्यांच्या स्मृतीला अंधुकपणें मिल्टनचं तें महाकाव्य आठवलं– शेले, कीटसच्या कविता आठवल्या, भावगीतं आठवलीं आणि त्यांनीं हळूंच निःश्वास सोडला, मग त्यांना विनोदचाच राग आला, " इंग्रजी पिक्चर्समधील त्या उत्तानशृंगारानें अभिरुचि बिघडते आणि तरुणतरुणींनीं तसलें खेळ

बघूं नयेत" असा कांहींसा विचार त्यांनीं विनोदला बोलून दाखवला. यावर बेमुर्वतपणें विनोद म्हणाली "इश्श ! आज अगदीं एखाद्या आजीबाईचा आव आणून उपदेश करीत आहेस कीं ग ! मला आठवतं माझ्या लहानपणीं, मला घरीं ठेवून तूं नि काका त्या ग्रेटा गार्बोच्या पिक्चरला जाण्यासाठीं किती उत्सुक असावयाचे तें ! खरंच कीं ! आतां तू लौकरच आजी होणार आहेस म्हणा-" विनोद हंसत हंसत आंत चालती झाली, आणि शकुंतलाबाईंना मात्र त्याचं कौतुक वाटलं नाहीं ! हा आपला अपमान आहे, आपल्या तारुण्याची शरणागती आहे, हा विचार त्यांना भेडसावयास लागला. कुठल्यातरी अट्टाहासानें त्या प्रेरित झाल्या होत्या ! ......

चार वाजतां हळुहळूं मंडळी जमावयास लागली. प्रभा, सिंधू शाळेंतून परतल्या, त्यांना कांहींतरी खावयास दिलं. मग त्यांचा भाचा शीळ वाजवीत कॉलेजांतून परतला, त्यालाहि त्यांनीं खावयास दिलं. त्या सर्वांचा चहा करावयास लागल्या, मग हाशहुश्श करीत रामभाऊ कचेरींतून परतले, आणि पुन्हा त्यांच्या जीवनाचं यंत्र सुरूं झालं, तें आतां रात्रीं दहापर्यंत थांबणार नव्हतं- चहा, त्यानंतर स्वयंपाक, त्यानंतर जेवणीं, त्यानंतर आवराआवर, आणि मग अकरा वाजतां अंथरूणावर पडणं- हल्ली त्यांना झोंप तरी कुठें येत होती ? उगीचच तळमळत पडावं लागतं होतं, कारण कुठलंच गत्यंतर नव्हतं !

नेहमींच्या संवयीप्रमाणें त्या अंथरुणांत पडल्या आणि अचानकच बंड करण्याची त्यांना हुक्की आली ! सकाळपासून धुसमत असलेल्या ज्वालामुखीचा स्फोट करावासा त्यांना वाटला! वयाच्या मर्यादा उल्लंघून, लेकराबाळांची लाजलज्जा सोडून पतीला कवटाळावं, त्यांच्याशीं गप्पा माराव्यात, रात्रींबेरात्रीं चांदण्यांत फिरावयास जावं- अल्लडपणानें वागावं आणि हें सारं करतांना जगाकडे बघून तुच्छतेनें हंसावं- या विचारांनीं त्या सारख्या तळमळत होत्या, सारी रात्र डोळयाला डोळा नव्हता.

रात्रींचा चारपांच वाजण्याचा सुमार असावा, सारं विश्व शांत होतं. अखिल जीवसृष्टी मृत्यूप्रमाणें निश्चल झालेली होती. परंतु शकुंतलाबाईना हें सारं असह्य होत होतं– त्या अंथरुणांतून उठल्या, आणि रामभाऊंच्या पलंगाजवळ क्षणभर उभ्या राहिल्या, कुठल्यातरी सुप्त चेतनेनें त्यांना आज प्रवृत्त केलं आणि त्या त्यांच्याशेजारीं पडल्या– रामभाऊंचीं झोप चाळवली गेली आणि त्यांनीं आश्चर्यानें आपल्या पत्नीकडे बघितलें– त्यांना क्षणभर या गोष्टीचा अर्थच कळेना, पण तो ध्यानांत येण्यासाठीं त्यांना उशीर लागला नाहीं! तसा मग त्यांना एकदम राग आला. बायकोच्या निर्लज्जपणाची चीड आली आणि स्वतःच्या दौर्बल्याचं मनस्वी वाईट वाटलं! त्यांनीं आपल्याच जागीं थोडीशी चुळबुळ केली, आणि सुटका करून घेण्याचा प्रयत्न करून बघितला. परंतु शकुंतलाबाईंच्या वाळलेल्या हातांचा विळखा त्यांच्या शरिराभोंवती पडलेला होता आणि तो त्यांना भुताच्या मिठीपेक्षांहि भयंकर भासत होता. त्यांनीं आपल्या झडलेल्या शरीराला तजेला देण्याचा प्रयत्न केला, झोपलेल्या वासनांना जागृत करण्याचा प्रयत्न केला–पण त्यांचा कांहींच उपयोग झाला नाहीं! कुठल्यातरी अज्ञात शक्तीनें त्यांना केव्हांच नष्ट केलं होतं– शरीरावरचा आणि मनावरचा त्यांचा ताबा केव्हांच नाहींसा झाला होता. आपल्या दुबळेपणाच्या समर्थनासाठीं ते आपल्या पत्नीवर रागावले "तुम्हाला कांहीं लाजबीज वाटत नाहीं का हो? या वयांत शोभतं काय हें असलं? मुलं पलिकडे झोपलीं आहेत निदान त्यांची तरी कांहीं बाळगाल कां नाहीं?" तसा शकुंतलाबाईचा विळखा एकदम सैल झाला, त्यांना नवऱ्याचा भयंकर संताप आला, आपला कोंडमारा करणाऱ्या जगाचा, लेकराबाळांचा सर्वांचा त्यांना वीट आला आणि एवढ्यांत सकाळ झाली! गल्लींतील कोंबडा आरवला, जणूं तो शकुंतलाबाईचा उपहास करीत होता! त्यांना खिजवीत होता! त्या तळमळत आपल्या अंथरुणावर येऊन

पडल्या. रात्रीचा काळोख हळुहळूं नाहींसा होत होता, पण त्यांना वाटलं हा काळोख कधींच संपू नये- आपल्या काळ्या ठिक्कर झालेल्या जीवनाप्रमाणें, साऱ्या विश्वाची कळा अशीच काळवंडावी. परंतु सृष्टीचा कलाकार हळूं हातानें रात्रीचा काळा रंग पुसावयास लागला होता, आणि प्रकाशाच्या त्या छायांची शकुंतलाबाईना मनस्वी भीति वाटत होती ! !



# २. चक्र

बाबा अरळकर नेहमींप्रमाणें चार वाजतां झोंपेंतनं उठले अन् मग त्यांच्या कॉलेजांत शिकणाऱ्या दिनूच्या खोलींतील घड्याळ खणखण् खणाणलं. तशी मग दिनूनें झोंपेंतच एक आर्वाच्य शिवी घड्याळाला हासडली अन् अलार्म बंद करून चाळवलेलं स्वप्न तो पुन्हां आठवूं लागला— थोड्याच वेळापूर्वी त्याच्याशीं गुलगुल बोलणाऱ्या सुशीलेला त्यानं पुन्हां बोलावलं अन् मग तो तिच्या लांबसडक शेपट्याशीं चाळा करावयास लागला. बाबा अरळकरांनीं हा सारा प्रकार कल्पनेनें ताडला अन् मग त्यांना एकाएकीच दिनूच्या भवितव्याविषयीं साशंकता निर्माण झाली. ते 'हरे राम' म्हणत अंथरुणांतून उठले व त्याची वळकटी करून ठेवून दिली. मिणमिणणारी उशालगतची टिपटिपी त्यांनीं थोडी मोठी केली, प्रातर्विधि उरकले अन् मग ते आपल्या नेहमींच्या दाराजवळील जागेंत अंगाचं मुटकुळं करून भिंतीला रेलून बसले. ते आपले दररोजचे अभंग गुणगुणूं लागले, भूपाळ्या म्हणूं लागले, मनाचे श्लोक बडबडूं लागले आणि आपलं एक चित्त या नियमित गोष्टींत गुंतवून दुसऱ्या चित्तानें सांसारिक विचार करावयास लागले. त्यांची अकराव्यांदा गरोदर असलेली बायको पलीकडे झोंपली होती. दोन-तीन लहान मुलें तिच्या सभोंवतालीं अस्ताव्यस्त पडलीं होतीं. दारालगतच्या कोपऱ्यांत मॅट्रिकला शिकणारी शांता आपल्या साधारणच पण टापटीप अंथरुणांत घोरत होती. अन् बाबा अरळकर अचानक तिच्या लग्नाचा विचार करावयास

लागले. येत्या मार्गशीर्षांत पोरीला आठरावें वर्ष लागणार ह्या विचारानें त्यांच्या काळजांत धस्स झालें. पोरगी किती वाढली आहे, ह्या कल्पनेनें ते अस्वस्थ झाले आणि कां कुणास ठाऊक त्यांना कसेसेंच होऊं लागलें. पोरगी फारच फार मोठी झाली आहे, हल्लीं ती फारच लाडिकपणा करते आणि सदानूकदा सिनेमांतलीं गाणीं गुणगुणते- दिन्याच्या मित्रांबरोबर कारण नसतांनाहि उगाच कांहीं तरी बोलत राहते, शेजारच्या सद्या नळावर थोबाड धुवावयास आला म्हणजे कळशी उचलून आपल्या समोरून ताड्ताड् निघून जाते, आणि ती हें सारं करत असतांना आपण मात्र बावळटासारखें नुसतें बघत राहतों. 'तें कांहीं नाहीं, कारटीला वठणीवर आणलंच पाहिजे.' बाबा अरळकर निश्चयानें आपल्या गुडघ्याभोंवतीं उपरणें गुंडाळावयास लागले. तसा मग त्यांचा आठव्या वर्गांत शिकणारा श्याम झोंपेंत मोठमोठ्यानें बरळावयास लागला, "चोर! चोर!! काळभैरव, धनंजय पकडा त्या बदमाषाला बाबा, बाबा! तो आपल्या घरांत शिरला, ताईला पळवून नेत आहे- धरा! धरा त्याला." बाबा अरळकर झटक्यांत जागेहून उठले आणि मग त्यांनी श्याम्याला हिसक्यासरशीं जागं केलं. त्यानं दचकून एक आंचका दिला- 'ऊठ गाढवा! सकाळ झाली तरी पडून राहतात, अभ्यास बिभ्यास कराल तर कांहीं खर्चेल काय तुमच्या बापाचं?-" त्यांनीं सर्वांना ऐकावयास येईल अशा बेतानं शब्द उच्चारलें आणि तें तसेंच अंधारांत अदृश्य झालें, घरांतील शांततेंत प्रतिध्वनित झाले. बाबा अरळकर स्वतःशींच मोठ्यांदा दचकले. आपण फारच जोरांत खेंकसलों याची त्यांना जाणीव झाली; पण त्यांच्या ओरडण्याचा अथवा अस्वस्थतेचा संबंध जगावरच काय, घरांतील माणसांवर देखील परिणाम झाला नाहीं. नाहीं म्हटल्यास त्यांच्या बायकोची झोंप किंचित् चाळवली, त्यांनी आपला पावणे दोनशे पौंडाचा देह भिंतीकडील बाजूस केला आणि झोंपेंतच अंगांवरील अस्ताव्यस्त पातळ जरा सावरलं.

बाबा अरळकर हें दृश्य बघतच राहिले, आपण ह्याहिपेक्षां जोरांत ओरडावयास पाहिजे होतं, याची त्यांना जाणीव झाली; पण आतां ओरडावयास कुठलंच कारण दिसेना त्यामुळें ते मग स्वतःवरच चरफडले आणि 'अनुदिनि अनुतापें तापलों रामराया–' जोरजोरांत म्हणावयास लागले, अक्षरशः किंचाळूं लागले– आणि एवढ्यांतच झोंपेंत सुशीलेचें स्वप्न बघणाऱ्या दिन्याच्या किंकाळीनें ते पुन्हां शांत झाले.

दिनू जिला सुशीला समजून प्रेम करावयास लागला होता ती मुळीं सुशीला नव्हतीच. मॅक्बेथमधील तीन चेटकिणींपैकीं ती एक चेटकीण होती आणि दिनू गाढवासारखा तिच्यावर भाळला, तिच्यावर प्रेम करावयास लागला, तिचं चुंबन घेण्यासाठीं तिला जवळ जवळ ओढावयास लागला. अन् तिनं फडकन् थोबाडींत देतांच तो हलकेंच विव्हळला अन् तिचा तो भयाण चेहेरा बघून जोरांत किंचाळला. ती आपल्याला ओढून नेत आहे या कल्पनेनें तो चुळबुळ करावयास लागला, भेदरून कॉटच्या खालीं दणकण् आदळला– आणि मग बाबा अरळकर हलकेंच म्हणाले– "दिनकर, अरे दिनू! उठायचं आहे कां बाळ? जागा हो बघूं"

दिनू "ऊं" करत जागा झाला अन् परत कॉटवर चढून झोंपला.

बाबा अरळकरांचा पुन्हां संताप झाला. आपण काय त्याला मूर्खासारखं सौम्यपणानें बोलण्याची झक मारली, ह्याचाच त्यांना पश्चाताप झाला. नाहीं तरी आपली ही अत्यंत जुनी संवय आहे, याची त्यांना अचानक आठवण झाली. दिनू त्यांचा सर्वांत वडील मुलगा आणि पर्यायानें अत्यंत लाडका होता. त्यानं आजपर्यंत प्रगट केलेली, कुठलीहि इच्छा बाबा अरळकर बावळटासारखी पूर्ण करत आले होते. आतां तो कॉलेजांत शिकत होता याच्या तरी मुळाशीं काय होतं? खरं म्हणजे कॉलेजशिक्षणाचा खर्च झेंपण्याची त्यांची परिस्थिति नव्हती. भिक्षुकीचा वाडिलोपार्जित धंदा ते चालवीत होते. पोथ्या–पुराणें

वाचण्याइतपत शिक्षण घ्यावं हा त्यांच्या घराण्याचा आजपर्यंतचा शिरस्ता होता. परंतु दिनू या परंपरेला अपवाद ठरला होता. तो चौथ्या वर्गांत पास झाला तेव्हांच बाबा अरळकर त्याला आपल्या धंद्यांतील " ए, बी, सी," शिकवावयास लागले; पण कार्ट्याचं नशीब विलक्षण होतं– चांगलं भटजी बनण्याचं सोडून त्याला शिक्षणाचें डोहाळें आठवले आणि त्याच्या हट्टापुढें बाबा अरळकरांचा नाइलाज झाला. त्यांनीं पोराला मॅट्रिकपर्यंत शिकवलं आणि इथूनच तो पूर्णपणें वाहवला. भटजी नाहीं तर त्यानें निदान कचेरींतला कारकुन तरी व्हावें असं बाबा अरळकरांना वाटावयास लागलें, यांतहि त्यांच्या कुळाला कमी भूषण नव्हतें– पण दिन्या कॉलेजच्या गोष्टी सांगावयास लागल्यामुळें, पुन्हां बाबा अरळकरांना शरणागति स्वीकारावी लागली.

नकळतपणें दिनूचे सारे हट्ट ते पुरवूं लागले. तीन खोल्यांच्या बिऱ्हाडांतील एक स्वतंत्र खोली त्यांनीं दिनूला अभ्यासासाठीं दिली. त्याला दोन सूट शिवले. खोली सजवायला पैसे दिले आणि तरीहि ते अंतरांतून दिनूवर चरफडत होते. त्याला कांहीं बोलूं शकत नव्हते. ज्या घराच्या भिंतीवर त्यांनीं आजपर्यंत जिवतीचे, वटसावित्रीचे आणि इतर देवादिकांच्या फोटोंखेरीज कांहीं बघितलें नव्हते, तिथें आज त्यांच्याच मुलानें या सर्व फोटोंचें उच्चाटन करून चक्क नटींचे अर्धनग्न फोटो लावले आणि बाबा अरळकर डोळे फाडफाडून त्याकडे बघतच राहिले. त्यांच्या डोळयांना नीट दिसेना गेलें, तेवढेंच त्यांना समाधान वाटलें. दिन्याच्या अभ्यासाच्या खोलींतील धुडगूस मग त्यांना आठवला. चार आपल्यासारख्याच टोळभैरवांना बोलावून त्यांच्या खि ऽ खि ऽ करीत चाललेल्या गप्पा त्यांनीं ऐकल्या होत्या. बंद केलेल्या दारांतून मिलच्या धुराड्यांतून बाहेर पडावा तसा सिगारेटचा धूर बाहेर पडून त्यांच्या डोळ्यांत शिरत असे. डोळ्यांना पाणी येई आणि तरीहि त्यांना समजत नसे कीं आपण हें सारं कां करीत असतों? तसं मग त्यांना एकदम

जाणवलं कीं,आपल्या पिढीजाद भिक्षुकीच्या धंद्यामुळेंच आपल्या स्वभावांत अशा प्रकारची लाचारी आली असावी. आपण मानापमानाच्या मर्यादेबाहेर गेलों आहोंत! यजमानांच्या पुढें पुढें घोटाळण्याच्या संवयीनें आपला नाश केला आहे. आपला स्वभाव लुडबुड्या बनला आहे. आपणांस कुणावर रागावतांच येत नाहीं. त्यांनीं आपल्या गरगरीत ढेरीवरून हात फिरविला, सुरकुत्या पडलेला जबडा गोंजारला आणि मग त्यांना विश्वास वाटावयास लागला कीं, आपण कांहीं मिळमिळीत नि किडकिडीत नाहींत आजकालच्या माणसाप्रमाणें! आपण मनांत आणलें तर वाघासारख्या डरकाळ्या फोडूं शकूं. माजलेल्या हत्तीसारखी, निदान बोकडासारखी दंगल उसळून देऊं शकूं– आणि मग ते कल्पनेनें चित्र रंगवावयास लागले. त्यांना जेवणानंतर होणारा आपला चेहेरा आठवला. तें कपाळभर पिवळंधमक गंध, अंगभर भस्माचे पट्टे, ती आपली साडेचार इंच लांब शेंडी, तुळतुळीत चंपी आणि गुटगुटीत चेहेरा, शेंडीची ती गोंडस गांठ आणि पोटाच्या तीन घड्या. शेजारचे नारभट नाकांत तपकीर कोंबीत नेहमीं म्हणावयाचे, "बाबा अरळकर, तूं एखाद्या वाघासारखा दिसतोस जेवणानंतर, जुन्या भटजीचं मॉडेल म्हणून तुला नुमायषमध्यें ठेवायला पाहिजे– पण आपलं सरकार लेकाचं दरिद्रीच आहे. माणसाची किंमतच नाहीं कुणाला!" नारभटाचं हें वाक्य बाबा अरळकरांना वेदवाक्य वाटावयास लागलें, साक्षात् सूक्त वाटलें, रुद्रांतील 'चमे चमे' मंत्रासारखें चमचमीत वाटलें आणि मग ते आपल्याशींच मिशांतल्या मिशांत हंसले!

ते तोंडानें "शांताकारं भुजगशयनं–" म्हणावयास लागले आणि तेवढ्यांतच वाघ बनून डरकाळ्या फोडावयास लागलें, आपल्या घराच्या गुहेंत धुडगूस घालावयास लागले. त्यांची बायको, दिनू, शाम्या, मॅट्रिकमध्यें शिकणारी शांता, सारे जण किंकाळ्या फोडावयास लागले आणि मग बाबा अरळकर खद्‌खद्‌ हंसले, त्यांचें सर्वांग गद्‌गद् हललें अन्

आपण सर्वांची कशी खोड मोडली या विचारानें स्वतःवरच खूष झाले, आपल्यावरच फिदा झाले आणि मग त्यांनीं आपल्या वाटोळया दंडाचें चक्क एक चुंबन घेतलें- तसें ते आपल्या या फाजीलपणावर केवढ्यांदा तरी दचकले, त्यांच्या मनांतील वाघ एकाएकीच भेदरून पळावयास लागला आणि बाबा अरळकर पंचांग घेऊन त्याच्यामागें धांवत सुटलें. धोत्राचा घोळ पायांत अडकून खालीं पडले, त्यांच्या शिल्लक असलेल्या दोन्ही दाढा पडून गेल्या आणि शेंडीची गांठ सुटून ती सैरावैरा डोक्यावर नाचावयास लागली. बाबा अरळकरांची केवढी फजिती ! !

आपली फजिती कुणी बघितली कीं काय म्हणून त्यांनीं दारांत बघितलें. चेहेऱ्यावर देवीचे वण असलेला गौळी दूध घालावयास आला होता- तसें बाबा अरळकर स्वतःशींच लाजले, त्यांना कसेसेंच झालें- ते दूध घेण्यासाठीं जागेहून उठले, आणि एकदम त्यांचा कासोटा निसटला आतां तर त्यांना अगदीं मेल्याहून मेल्यासारखें झालें, आपण एवढें कसें वेंधळे आहोंत, ह्याचंच त्यांना नवल वाटलं. त्यांनीं मग आंत जाऊन पातेलं आणलं, गौळयाकडून दूध घेतलं आणि स्वयंपाकघरांत जाऊन शेगडीला कोळसे घातले. शेगडी पेटत ठेवून ते बाहेर आले आणि नळावर जाऊन स्नान करावयास लागले. मोठमोठ्यानें मंत्रोच्चार करावयास लागले, त्यांनीं नळावरच संध्या आटोपली आणि ते देवपूजेला येऊन बसले.

मग घरांतील एकेक मंडळी आळोखेपिळोखे देत उठावयास लागली-सर्वांत प्रथम त्यांची मॅट्रिकमध्यें शिकणारी पोरगी उठली आणि नेहमीच्या संवयींप्रमाणें आपलें डोकें खाजवावयास लागली. एखाद्या सिनेमांतील नटीसारखें हळुहळू तिनें आपले कपडे व्यवस्थित केले. उशी मांडीवर घेऊन ती कितीतरी वेळ उगाच विचार करीत बसली आणि अचानकच तिनें ती हलकीच पलीकडे झोंपलेल्या श्याम्याला मारली-शाम्या ऑंव ऑंव करीत उठला आणि आपल्या

चिपडया डोळयांनी मिचमिच करीत बहिणीकडे आश्चर्यानें आ वासून बघावयास लागला. ताईला काळभैरवानें पळवून नेऊन आपल्या अज्ञात गुहेंत ठेवल्याचं चक्क स्वप्न त्याला अगदीं पहांटेपूर्वी पडलं होतं आणि या हिशेबानें तो आतां उठल्याबरोबर धनंजयकडे जाणार होता. त्यांचा सल्ला घेणार होता आणि जमलंच तर स्वतःच तिला धुंडाळून काढणार होता. ताई आपल्याच कौतुकांत निमग्न आहे हें बघून त्याची अत्यंत निराशा झाली. धनंजयाला भेटावयाला जाण्याची इच्छा मनांतच जिरली आणि मग रागानें त्यानें तीच उशी ताईला फेंकून मारली. उशीच्या त्या मऊ स्पर्शानेंच शांतीला गोड गोड संवेदना व्हावयास लागल्या–तिनं आपलं अंग जास्तच आंत चोरण्याचा प्रयत्न केला. तिला खूप खूप लाज वाटली. तिनं आपले भिरभिरणारे हरिणीसारखे डोळे ( ही उपमा तिचीच आहे !) शून्यांत वळवीत लाडिकपणें एक मुरका मारला. ताईला झीट आली आहे कीं काय ह्याची श्याम्याला शंका आली आणि तो एकाएकीच ओरडायला लागला. त्याच्या ओरडण्यानें भागिरथीबाईनीं आपला पावणेदोनशें पौंडांचा देह भिंतीकडून पोरांकडे वळविला आणि त्या खेंकसल्या, " सकाळ नाहीं झाली कीं ओरडायला लागले मेले! काय झालं रे एवढ्या मोठ्यानें किंचाळायला ?" तसा मग श्याम आपल्या आईच्या चंडिकावताराला घाबरून गप्प बसला. त्याला दरदरून घाम आला.

" आई ही बघ ना ग ताई कशी करते आहे ती –"

त्यांनीं शांताला पट्टयावर घेण्यास प्रारंभ केला, त्या तिला शिव्या देऊं लागल्या ' चल, ऊठ, चहाचं आधण ठेव–दिवस वर आला तरी पसरून राहतात द्वाडाचे !'–ह्याच रागाच्या भरांत त्यांनीं तिला हुकूमहि सोडला. नाहीं तरी पोरीकडून काम काढून घेण्यासाठीं त्या नेहमीं प्रसंगाची वाटच बघायच्या. शांती स्वयंपाकघरांत म्हणजे खोली नंबर तीनमध्यें गेली आणि बाबा अरळकरांनीं पेटवून ठेवलेल्या शेगडीवर

चहाचं आधण ठेवावयास लागली. बाबा अरळकर देवांना ताम्हणांत बुचकाळीत होते. तोंडानें पुरुषसूक्त म्हणत होते. चहाचं आधण ठेवलेलं बघतांच, त्यांनीं देवांना भडाभडा स्नान घातलें आणि वस्त्रानें खसखसा पुसावयास आरंभ केला. मग ते देवांना वस्त्र नेसवूं लागले. गडबडींत लक्ष्मीचें वस्त्र विष्णूला नेसवलें गेलें, आणि मारुतरायांना तर त्यांनीं तसेंच ठेविलें. त्यानंतर त्यांनीं कशीबशी आरती संपवली आणि साऱ्या देवांना संबळींत भरलें. मग ते ओवळ्यांत झाले आणि शांतानें पुढ्यांत ठेवलेला चहाचा कप आधाशासारखा प्यावयास लागले.

त्यांची बायको आपल्या नऊ मुलांमुलींसहित आंत आली आणि आपल्या ह्या अफाट विस्ताराकडे बघून बाबा अरळकरांना अचानक ठसका लागला आणि त्यांनीं चहा अंगावर सांडून घेतला. ते उगीच घाबरले. पांच मुलांच्या अद्याप मुंजी झाल्या नव्हत्या, दोन पोरींची अद्याप लग्नें करावयाचीं होतीं, दिन्याचा कॉलेजचा खर्च, इतर मुलांचं शिक्षण, या साऱ्या गोष्टी त्यांना आठवावयास लागल्या. अन् ते विचारमग्न अवस्थेंत चहाच्या बशींत आपला मिसाळ चेहरा बघूं लागले. तशी मग त्यांना आजच्या कामांची अचानकच आठवण झाली. पांच घरचे सत्यनारायण, दोन घरचीं श्राद्धं, तीन घरच्या वास्तुशांति, कुठलं कीं एक बारसं—एवढीं कामें करायचीं, सारी दक्षिणा कमरेला खोवायची, प्रत्येक घरीं मुलांमुलींना जेवणासाटीं पिटाळायचें आणि त्यानंतर नारभटाकडे जाऊन गप्पा मारावयाच्या. राममंदिरांत हरदास बोवांच्या कीर्तनाला जायचं—दिनूलाहि आपल्या बरोबर येण्याचा आग्रह करायचा. कॉलेजला शिकत असला तर काय झालं ? देवादिकांची भारीच चीड आहे आजकालच्या पोरांना — तें कांहीं नाहीं. सर्वांनीं दररोज देवदर्शनाला जाण्याचा ते नियम करणार होते. एकेकाचा कान धरून ते देवापुढें प्रत्येकाचें नाक तांबडेलाल होईपर्यंत घासणार होते.

दिनू अद्यापहि कॉटवर पडूनच होता, तसा बाबा अरळकरांनीं

श्याम्याला हुकूम सोडला, 'जा त्याला ऊठ म्हणावं'– आणि मग श्याम्या रहस्यमालेंतील चोरासारखा हलक्या पावलांनीं दिनूच्या खोलीकडे निघाला, त्यानें दाराचें उगाच निरीक्षण केलें– मग तो दिनूच्या कॉटशेजारीं उभा राहिला, त्यानं त्याच्या उशाला चांचपलं, एखादं पिस्तूल तिथं असेल असं त्याला वाटलं, पण एक चुरगाळलेला कागद तेवढा त्याच्या हातीं लागला. तो उघडून वाचावयास लागला, दिनूनें गिचिडमिचिड अक्षरांत लिहिलेले शब्द तो एकेक करून अडखळत वाचीत होता –

" प्रिय सुशीला –

मी तुला बाराव्यांदा प्रेमपत्र पाठवीत आहे, पण तें तुला देण्याचा धीरच होत नाहीं. तूं रस्त्यानें ऐटींत चालतेस तेव्हां माझ्या हृदयाला अक्षरशः घरें पडतात आणि माझं बंडखोर मन जागं होतं; पण परत सारे विचार भिंतींतील ढेंकणाप्रमाणें तूं घरें पाडलेल्या हृदयांतच गडप होतात आणि मी मात्र पिंजऱ्यांतील उंदराप्रमाणें नुसताच खुडबुडत राहतों–"

श्याम्या ख्या ऽ ख्या ऽ करून हंसावयास लागला, असलं कांहीं भलतं सलतं दादा लिहीत असेल असं त्याला वाटलं नव्हतं. तशी मग दिनूची त्याला कींव आली. आपण 'छोटूसारखी' त्या सुशीलेवर का बिशीलेवर पाळत ठेवायची आणि दिनूला 'झुंझार' हो म्हणून सांगावयाचें – दिनू ऐकेनाच गेला तर आपणच त्या पोरीला क्लोरोफॉर्मनें बेहोष करावयाचें आणि कुठें तरी गुप्त ठिकाणीं नेऊन ठेवायचें, दिनूला हलकेंच तिथें न्यावयाचें आणि मग त्याच्याकडून मोठें बक्षीस उपटायचें. त्याला एकदमच कसला झटका आला कुणास माहीत! त्यानं चादरीची दशी दिनूच्या नाकांत कोंबली, तसा दिनू फटाफट शिंकत जागा झाला. श्याम त्याच्या शिंका मोजावयास लागला. दिनूला तो खुळा समजून त्याच्याकडे टंवकारून बघूं लागला आणि मग एका माणसाची कशी जिरवली या कल्पनेनें स्वतःवरच बेहद्द खूष झाला.

दिनूला काय घडलं याची कांहींच कल्पना येईना. मघाची चेटकीण त्याच्या स्वप्नांतून निघून गेली होती आणि आतां कुठें नुकतीच खरो-खरीची सुशीला त्याच्याकडे आली होती–ती 'मधुबाला' प्रमाणें खुदकन् हंसली आणि दिनूनें तिच्याकडें 'लॉरेल हार्डी' च्या सिनेमांतल्याप्रमाणें लॉरेल-सारखा रडका चेहेरा करून बघितलें–तशी ती दिनूसाठीं कळ-वळली, तिला त्याची दया आली आणि त्याची समजूत काढण्यासाठीं ती अगदीं त्याच्या शेजारीं बसली. दिनू थोडासा धीट बनला आणि तो तिला कांहीं तरी सांगणार तोंच त्याचा घसा दाटून आला, नाकांत गुळगुळ व्हावयास लागलें आणि तो शिंकत जागा झाला.

श्याम्याचें कारस्थान लक्षांत येतांच, त्यानं त्याच्या पाठींत एक धपाटा लगावला, तसा श्याम 'चीनी रहस्यांतील' 'यो शिंग तँग' सारखा खुनशी नजरेनें दिनूकडे बघावयास लगला. दिनूला साह्य करण्याची त्याची इच्छा पार खतम् झाली आणि तो तोंड वेंगाडून म्हणावयास लागला, "थांब, थांब !– मी बाबांना सांगतो कीं तूं सुशीलेस पत्र पाठ-वतोस अँ, अँ !– ती तुला ढेंकूण समजतें आणि तूं उंदीर आहेस–" दिनूनें आपली नांगी पटकन् खालीं टाकली. श्याम्याला आपलं रहस्य समजलं हें कांहीं ठीक झालं नाहीं असं त्याला वाटावयास लागलं. तसं मग त्यानं शामला जवळ बोलावलं, चालू महिन्याच्या साऱ्या रहस्य-माला विकत घेऊन द्यायचं अमिष दाखवलं– मग तो कडाकड जांभया देत स्वयंपाकघरांत गेला अन् चहाचा कप तोंड न धुतांच ढसढसा प्याला. बाबा अरळकर डोळे वटारून त्याच्याकडे बघावयास लागले, हें त्याच्या हिशेबांतच नव्हतं! ते अस्पष्टपणें म्हणाले "काय घाणेरडीं आहेत आजकालचीं मुलें ! तोंड न धुतांच चहा पितात–"

बाबा अरळकरांच्या मागासलेल्या विचारांवर दिनू खंवचटपणें हंसला–त्याची ही आवडती खोड होती. जग किती पुढें पुढें जात आहे, याची तो त्यांना दररोज माहिती सांगत असे. ऑम्लेटमध्यें किती

व्हिटॅमिन्स् असतात याची चर्चा करीत असे आणि बाबा अरळकर पोराच्या अफाट ज्ञानानें दिपून जात, मुलाचं हें सारं कौतुक अगदीं गुपचिप ऐकत–कित्येकदां यामुळें त्यांच्या जिव्हारीं घाव बसत असे आणि तरीहि दिनूला दटावण्याचं ते नेहमींच विसरून जात. आपलीच मुलें आपणांस वाटेल तें कसं बोलतात ह्याचंच ते मनाशीं आश्चर्य करीत !

आणि मग त्यांना सकाळचा वाघ आठवला – त्याच्या डरकाळ्या आठवल्या आणि या विचारानें ते स्वतःच घाबरलें–तसा तो वाघ त्यांच्या घरापुढील मरतुकड्या कुत्र्याएवढा झाला. दोन्ही पायांत शेपटी घालून पळत सुटला आणि त्याच्यामागें दिनू, श्याम्या, मॅट्रिकमध्यें शिकणारी शांता, त्यांची बायको, धाकटीं शेंबडी कारटीं सारीं सारीं पळावयास लागलीं आणि बाबा अरळकर पंचांगाची पानें फडफडवीत हें सारं बघत उभे राहिले, भीतीनें भेदरले.

दिन्या त्यांच्या घाबरलेल्या चेहऱ्याकडे बघून हंसावयास लागला – धाकटं मूल त्यांच्या ढेरीवर गुद्दे मारावयास लागलं आणि त्यांची अकराव्यांदा गरोदर असलेली बायको कौतुकानें बघावयास लागली–बाबा अरळकर आपल्या या हलाखीच्या परिस्थितीवर स्वतःच चरफडले. ते सोवळं नेसून घराबाहेर पडावयास लागले.

त्यांची मॅट्रिकमध्यें शिकणारी शांता हंसत हंसत म्हणाली, " बाबा, बाबा ! तुम्ही किनई सिनेमांतल्या गोपसारखे दिसतां–"

त्यांना गोप म्हणजे काय चीज आहे, हें माहीत नसल्यामुळें त्यांनीं आपला चेहेरा जास्तच वेंधळा केला. त्यांचें सकाळचें सारे बेत एकामागें एक ढासळावयास लागलें आणि हें सारं कसं काय होत आहे, ह्याची त्यांना कांहींच कल्पना येईना.

" बाबा बाहेरून लौकर परत या अं–मला थोडेसे पैसे हवेत–" दिन्यानें सूचना दिली.

त्याच्या पाठोपाठच शांता म्हणाली, "बाबा! एक सुंदर सिनेमा लागला आहे, मी माझ्या एका मैत्रिणीबरोबर जाणार आहे, मलाहि पैसे पाहिजेत –"

"मला रहस्यमालेसाठीं सव्वा रुपया पाहिजे" श्याम्यानेंहि वाहत्या गंगेंत हात धुतले.

बाबा अरळकर मागण्यांच्या या ॲटमबॉम्ब्सनीं गारद झाले. त्यांना पायापासून शेंडीपर्यंत मुंग्या चढल्यासारखें वाटलें. त्यांचा आधीच बावळट असलेला चेहरा जास्तच बावळट दिसूं लागला–

"असं काय मेलं पाहणं तें अंगावर पाल पडल्यासारखं – आणि हो! बरी आठवण झाली– येतेवेळीं थोडी केळीं घेऊन या बरं न विसरतां– आजकाल अन्नावर वासनाच राहिली नाहीं–" भागिरथीबाई लाजत लाजत म्हणाल्या.

बाबा अरळकरांचा उंदिर बनला, आणि ते कसेंबसें घराबाहेर निसटले. त्यांनीं भेदरून घराकडे दृष्टि टाकली, तसा मग त्यांनीं सुटकेचा एक सुस्कारा सोडला आणि ते आजच्या प्राप्तीचा हिशेब करावयास लागले– पांच घरच्या सत्यनारायणाचे सव्वासहा रुपये, दोन श्राद्धांचे पांच रुपये, तीन घरच्या वास्तुशांतीचें दहा रुपये–एकूण आज त्यांना सव्वा एकेवीस रुपये मिळणार होते आणि घरांतील सारी मंडळी त्यांच्या वाटेवर डोळे लावून बसणार होती, त्यांचा घामानें थबथबलेला पैसा न् पैसा हिसकावणार होती. या विचारानें तें पुन्हां संतापले, तोंडातल्या तोंडांत पुटपुटावयास लागले आणि मग त्यांना प्रश्न पडला आपण काय म्हणून या बांडगुळांना घाबरतों? मग त्यांनीं विचार केला, आज आपण कुण्णाच्या बापालाहि एक पैसा देणार नाहीं – बस्स! आज आपणच चैन करायची – आपणच कां दारिद्र्यांत खितपतायचं? – शांती मघा म्हणत होती तो सिनेमा आपणच पाह्यचा, अगदीं केळीं खात बघायचा. एक रहस्यमाला विकत घ्यायची आणि भर चौकांत बसून

वाचून काढायची. कीर्तनबीर्तन रद्द ! – नारभटांच्या शिळया गप्पांना चाट द्यायची अन् मग जमलंच तर दिन्या नेहमीं सांगतो त्या ' इन्डीयन कॅफे ' मध्यें जाऊन एक झकास ऑम्लेट खायचें आणि घरच्या साऱ्या मंडळींकडे बघून उपहासानें हंसायचें–जगाला खिजवायचें–कसलीच फिकीर करायची नाहीं.

मग त्यांना परत सकाळचे वाघाचे विचार आठवले. तोंडानें मंत्र पुटपुटत ते डरकाळया फोडावयास लागले, शेपटी आपटावयास लागले आणि नकळतपणें खरोखरच हातांतील पळी, ताम्हणावर जोरजोरांत मारावयास लागले आणि एकदम यजमानांची चमत्कारिक नजर बघून ते अत्यंत घाबरले, त्यांनीं गपकन् आवंढा गिळला आणि पुन्हां आपले सरळ बाबा अरळकर बनले–!!



## ३. खुराडें

अशांत निःश्वासांनीं रात्रीचा काळा कोळसा विझावयास लागला. अतृप्ति प्रज्वलित होऊं बघत होती आणि असमाधान धुमसत होतं, हळुहळूं पेटत होतं--पूर्वेवर अरुणाच्या लाल ज्वाला भडकावयास लागल्या आणि तरीहि उषादेवी उद्यानांतील पाकळीपाकळीबरोबर खद्‌खदून हंसत होती--कळीकळीला हंसवीत होती...

वकीलवाडीमध्यें आळस रेंगाळत होता आणि निद्रा पांघरुणांत शिरत होती. वृद्धत्व चुळबुळत होतं आणि तारुण्य कंटाळत होतं-कंटाळून स्वप्नसृष्टीचा आश्रय घेत होतं...फूटपाथ हालचाल करावयास लागला आणि श्रमानें ग्लानि येऊन रात्रभर श्रांत पडलेला रस्ता आळोखे पिळोखे देत परत काम सुरूं करूं लागला. पोलिसचौकीवरील घड्याळानें सहा टोल वाजवले आणि दामूअण्णांनीं ते ऐकूनहि न ऐकल्यागत केलं, त्यांनीं ब्लँकेट जास्तच वेष्टून घेतलं. दोन-तीन मिनिटेंहि झालीं नसतील, त्यांच्या घरांतील घड्याळानेंहि टोले दिले, तसा मग अण्णांना घड्याळाचा सपाटून राग आला. घड्याळाचा शोध लावलेल्या इसमाला त्यांनीं शिव्या देण्यास प्रारंभ केला,मग कांहीं क्षण याच अवस्थेंत गेले... त्यांच्या शिव्यांची लाखोलीहि पूर्ण झाली नाहीं तोंच दूधवाला येऊन ठेपला, त्याच्या आरोळीनें घरांतील शांततेला भेगा पडल्या...बोलण्याची यत्‌किंचितहि इच्छा नसलेले दामूअण्णा, पत्नीकडेच घोरत पडलेल्या आपल्या पत्नीच्या नांवानें ओरडले, "अहो!

ऐकायला नाहीं आलं का ? जरा उठून दूध घ्या बरं"–

ताराबाईंनीं डोळ्यांची उघडझांप केली, खोलींत लख्ख प्रकाश पडला होता. त्या नाराजीनेंच अंथरुणावर उठून बसल्या, आणि खुशाल ताणून पडलेल्या पतिराजांकडे 'खाऊं कीं गिळूं' या आविर्भावांत बघत जागेहून उठल्या, स्वयंपाकघरांत गेल्या...

दामूअण्णा दम रोखून पडले होते. स्वयंपाकघरांतील भांड्यांचा आवाज त्यांनीं ऐकला–तो त्यांच्या अंगावरणीच पडला होता. मग ताराबाईंची आदळआपट सुरूं झाली, त्यांच्या दाण् दाण् पावलें आपटण्यानें सारी पृथ्वी डळमळत असल्याचा अण्णांना भास झाला. कांहीं वेळानंतर हादरे मंदावले आणि त्यांच्या मनांत पडणारे ठोकेहि कमी झाले. स्टोव्हची फर्रफर्र सुरूं झाली, आणि चहाच्या गोड स्वप्नांत पुन्हां ते दंग झाले...

शेजारच्या पेन्शन घेतलेल्या मास्तरकडे सकाळ होऊन बराच वेळ झाला होता. अर्धं वर्तमानपत्र वाचून संपलं होतं आणि सकाळच्या चहाची उष्णता थंडावली होती...त्यांच्या फालतु शिस्तीला बळी पडलेला दिवाकर सकाळची सहल आटोपून घरीं परतला होता. भाज्या–चटण्यांना फोडण्या बसत होत्या आणि त्यांचा खमंग सुवास साऱ्या घरभर दरवळला होता. दिवाकर आतां स्नान करणार होता, त्यानंतर नाखुषीनें संध्या करणार होता, पोटभर जेवणार होता आणि टिफिन घेऊन ऑफिसला निघणार होता–तो मनांतल्या मनांत मास्तरवर चिडला होता, चिडून एखाद–दिवशीं बंड करणार होता...

वकीलवाडीच्या वरच्या मजल्यावरील लोक हलुहळूं उठावयास लागले. पुष्पा नेहमींच्या संवयीप्रमाणें गॅलरींत येऊन उभी राहिली, आणि आपले स्वप्नाळू डोळे सभोंवतालच्या जगाकडे लावूं लागली, मग तिची नजर एकाएकीच खालच्या मजल्यावरील कोपऱ्यांतील खोलीवर रेंगाळली. तिच्या अपेक्षेप्रमाणेंच श्रीकान्त तिथें उभा होता,

खिडकीजवळ उभा राहून तो अभ्यास करण्याचा निष्फळ प्रयत्न करत होता. मग त्या दोघांच्या नजरा क्षणभर एकमेकांना स्पर्शल्या आणि पुष्पा आंत चालती झाली. श्रीकान्तचा दीर्घ निःश्वास वरच्या रोधानें वाहूं लागला, गॅलरींतच अडकून पडला—

वकीलवाडी जागी झाली. स्त्रियांचे आवाज सुरूं झाले. लेंकरा-बाळांचं किंचाळणं, मोठ्यांचं दरडावणं, रडणं, हंसणं नि नाना तऱ्हेच्या चमत्कारिक आवाजांनीं तिथल्या जागेचा कोपरा नू कोपरा दुमदुमावयास लागला. मानवी आवाजाला रेडिओची साथ मिळावयास लागली, हॉटेलाहॉटेलांतील ग्रामोफोन संगीत ओकावयास लागले नि रस्ता मोटारच्या हॉर्ननीं कर्कशूं लागला, सायकली, रिक्षांच्या घंट्यांनीं किणूकिणूं लागला.

मग मध्यमवर्गाचं नियमित यंत्र सुरूं झालं. गुंड्याभाऊंनीं दामू-अण्णांचं दार ठोठावलं आणि नुकताच चहाचा कप तोंडाला लावलेले अण्णा चमत्कारिकपणें दाराकडे बघावयास लागले, दार उघडावें कीं न उघडावें या संभ्रमित अवस्थेंत पडले. त्यांच्या धाकट्या मुलाला अण्णांच्या या नजरेचा मुळींच अर्थ कळाला नाहीं. तो आपली चड्डी सावरीत दाराकडे गेला दार उघडलं गेलं आणि अण्णांचा चष्मा दाराची दिशा धुंडाळूं लागला. त्यांनीं कल्पनेनें रंगवलेला गुंड्याभाऊंचा चेहरा नेमका तिथं त्यांना दिसला. सुप्त मनांत शिव्या शिजावयास लागल्या आणि ओंठ मात्र फुरफुरले "या भाऊ! बऱ्याच दिवसांनीं सवड मिळाली?—" मग त्यांचे बसवलेलें दांत चमकले, स्वयंपाक-घराच्या दिशेनें ते ओरडले, "अहो! ऐकलं का? हे आपले गुंड्या-भाऊ आलेयूत- एक कप चहा आणा बघूं" ताराबाईनीं मोठमोठ्यानें कपबशांचा आवाज करून चहा संपल्याची वर्दी दिली, आणि अण्णा लाचारीनें हंसले. भाऊहि तेवढ्यांतल्या तेवढ्यांत म्हणून गेले, "राहूं द्या, राहूं द्या! चहा घेऊनच मी बाहेर पडलों—" मग त्यांच्या

राजकारणाच्या गप्पा रंगांत आल्या. सरकारचें परराष्ट्रीय धोरण चुकत असल्याचं दोघांचं एकमत झालं, गांवांतील हवामानाची चर्चा झाली, ओळखीच्या लोकांच्या उखाळ्या पाखाळ्या निघाल्या, हल्लीं जिवंत राहणं कसं धोक्याचं आणि मुष्किलीचं झालं आहे अशी दोघांनींहि तक्रार केली. तरुण पिढीच्या बेजबाबदारपणावर दोघांनीहि तोंडसुख घेतलं. आपल्या कॉलेजला शिक्षण घेणाऱ्या पोरांचा उद्धार केला, विडया शिलगावल्या आणि धुराचे लोळ सोडीत ते क्षणार्धात जागतिक प्रश्नांचा विचार करण्यांत निमग्न होऊन गेले....

शेजारचे पेन्शन घेतलेले मास्तर स्नान आटोपून भगवद्गीतेचा अध्याय म्हणूं लागले, दिवाकर संध्या करूं लागला, आणि मास्तरीण काकू पानें मांडावयास लागल्या. दिवाकर अधूनमधून प्राणायामासाठीं नाक दाबीत होता आणि वरच्या मजल्यावरील पुष्पाची धाकटी बहीण बेबी खेळ करणाऱ्या माकडवाल्याच्या लाल माकडाकडे बघतात, तशी दिवाकरकडे बघूं लागली—ती त्याच्या या चमत्कारिक अंगविक्षेपांना मोठमोठ्यानें हंसत होती. मग एकाएकीच दिवाकरनें डोळे उघडले आणि तो या चिमुरडया पोरीकडे रागारागानें बघावयास लागला. लहान पोरंसोरं देखील आपल्या सांस्कृतिक वागण्याची टिंगल करतात ह्या विचारानें तो खजील झाला. गीतेचा आध्याय मोठमोठ्यानें म्हण-णाऱ्या मास्तरकडे त्यानं मारक्या रेडयासारखं बघितलं आणि तरीहि मास्तरवर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं.

खालच्या मजल्याच्या कोपऱ्यांतील खोलींत राहणारा श्रीकान्त कॉलेजला निघायची तयारी करीत होता, नि आरशांत बघून शीळ वाजवीत भांग पाडीत होता आणि मधून मधून वरच्या गॅलरीकडे बघत होता. पुष्पाहि शाळेला निघायची तयारी करीत होती. ती आपली वेणी गुंफीत उगाच तरी सिनेमांतल्या नर्तिकेसारखी गॅलरी शेजारीं येऊन परत आंत जाई आणि दर वेळीं श्रीकान्तच्या हृदयाला आईस्फ्रूटची

सुरी मारल्यागत होई.

पोलिसचौकीच्या घड्याळांत नवाचे टोल पडले. वकीलवाडींतील कांहीं घड्याळांतहि नेमकी तीच प्रतिक्रिया झाली, मग रेडिओचे गळे दाबण्यांत येऊं लागले, विड्या सिगारेटी विझावयास लागल्या, स्नानाची धांदल सुरूं झाली. स्वयंपाकघरांतून ताटापाटांचा खडबडाट होऊं लागला. मग मध्यमवर्ग जेवावयास बसला. रेशनच्या धान्यांतील खडे दातांदातांतून भरडले जाऊं लागले आणि कुत्रा हाडें चघळतो त्याप्रमाणें वातड चपात्या चघळण्यांत येऊं लागल्या. पोरा-बाळांचा गिल्ला सुरू झाला आणि आयांच्या क्रोधिष्ट नजरेंत तो वितळावयास लागला. डाचणारं अन्न पोटांत रिचवून, शाळा, कॉलेज आणि ऑफिसाची धांदल सुरू झाली. पुन्हां धांदलीचे आवाज उमटले आणि कांहीं वेळानें शांत झाले. शाळा-कॉलेजचा रस्ता टिवल्याबावल्यांनीं रेंगाळूं लागला आणि ऑफिसच्या विश्वाची तारांबळ सुरूं झाली. पोरांच्या फिदिफिदी हंसण्याचे तुषार उडूं लागले आणि मुलींचं तोंडांतल्या तोंडांत पुटपुटणं सुरूं झालं. मध्यमवर्गाचा सारा लोंढा आपापल्या नियमित स्थळांवर पोहोंचला, अफाट सागर एका विशिष्ट मर्यादेजवळ जाऊन थबकला.

वकीलवाडी ओसाडवाडी झाली...बायकांचं सावकाश जेवण सुरूं झालं. कांहीं पदार्थांची देवाणघेवाण झाली. तासभर रवंथ करून बायका जेऊन उठल्या, मोलकरणी भांडीं घासण्यासाठीं आल्या, धुणीं धुवूं लागल्या. घरांत राहिलेली पेन्शनर पुरुषमंडळी कुठलीं तरी पुस्तकें चाळत पडली, पानपट्ट्या खलबत्त्यांत घालून कुटूं लागली, लहान अर्भकांचं अनंत आक्रंदन अजूनहि चालूंच होतं. मग वरच्या मजल्यावरील पुष्पाच्या आईनें रेडिओ लावला, मास्तरीणकाकू दारांत येऊन उभ्या राहिल्या, ताराबाईंना मात्र अद्याप सवड झाली नव्हती. मास्तरीणकाकूंचा दिवाकर ऑफिसला गेला होता आणि मास्तर 'गीतारहस्य'

छातीवर घेऊन पडले होते.

ताराबाई अण्णांच्या बेशिस्तीवर खूप खूप चिडल्या होत्या. अण्णा आपले घरांतील कपडे तसेंच अस्ताव्यस्त फेकून चालते झाले होते. मग एकाएकीच त्यांना अण्णांची सकाळची वागणूक आठवली. त्या दिवसभराचे परिश्रम उपसून रात्रीं कुठें शांत चित्तानें झोपत–तों वेळपर्यंत अण्णांचं कांहीं न कांहीं चाल्लूंच असे, मुलंबाळं, अण्णा, काम आणि घर या व्यतिरिक्त त्यांच्या जीवनांत कांहींच नव्हतं, ह्याची त्यांना आज आकस्मिक आठवण झाली. आपल्या जविनाचा त्यांना पश्चात्ताप झाला! स्त्रीजातीच्या जन्माला येऊन आपण फारच भयंकर चूक केली, असं त्यांना वाटावयास लागलं नि मग त्या आपलं तारुण्यांतील गोड स्वप्न मनांत घोळावयास लागल्या. सिनेमा नटी होण्याची त्यांची मनस्वी इच्छा होती पण त्यांच्या गोड स्वप्नांचा विनाश झाला होता. त्यांच्या आईवडिलांनीं त्यांना या संसाराच्या होमकुंडांत ढकललं होतं–समाजानं त्यांना बंदिस्त करून टाकलं होतं–त्यांना मग मध्यमवर्गाच्या मुर्दाडपणाचा उबग आला. त्यांना या सर्वांचा सूड घ्यायचा होता. त्या सिनेमांत जाऊं शकल्या नव्हत्या, नाहीं का ? हरकत नाहीं–याच संसारांत राहून, आपण वकीलवाडींत तरी कांहीं ना कांहीं पराक्रम करायलाच हवा, असा त्यांनीं संकल्प केला–आणि तसं मग त्यांचं विचारचक्र त्या दिशेनं भरकटावयास लागलं...

मध्यमवर्गाची एक लाट अलीकडच्या किनाऱ्याबाहेर जाऊं शकत नव्हती. ती तिथंच रेंगाळत होती. प्रामाणिक घड्याळानें बारा वाजवले आणि दमट दुपार वातावरणांत भिनावयास लागली. ऑफिसांत गेलेला मध्यमवर्ग जांभया देऊं लागला आणि आळस देतां देतांच मान मोडेपर्यंत काम करूं लागला. दिवाकरचीं बोटें भराभर टाईपरायटरवर फिरत होतीं आणि घाम खालच्या कागदांवर ठिबकत होता. पलीकडे बसलेल्या खिश्चन लेडीक्लर्ककडे त्यानं सकाळपासून बघितलं नव्हतं.

कामाच्या अतिव्यापामुळें त्याचं तारुण्य शिळं बनलं होतं... दामुअण्णा आपल्या नेहेमीच्या संवयीप्रमाणें कुरकुरत काम करीत होते– हेडक्लर्क-वर संतापत होते, ऑफिसरच्या नरडीचा घोंट घेण्याचीं स्वप्नें बघत होते. ज्या धैर्यानें सहजासहजी ते ताराबाईवर खेंकसूं शकत होते त्यांचं तें अफाट धैर्य ऑफिसरपाशीं फ्यूज उडालेल्या दिव्यासारखं नाहींसं होई– हें असं कसं होतं– ह्याचा विचार करण्यांत त्यांच्या सबंध नोक-रीची हयात संपायची वेळ आली होती आणि तरीहि याचं उत्तर मात्र त्यांना अद्याप सांपडलं नव्हतं, ते दररोज निश्चय करत कीं बस्स! ऑफिसरला बायको समजायचं, आणि या रुबाबांत काम करायचं पण बेटं तें अजून जमलंच नव्हतं– मरेपर्यंत जमणार नव्हतं! अजून एक तासानंतर इन्टरव्हल होणार, मग गरमागरम चहा घ्यायचा नि परत नव्या उत्साहानें कामाला प्रारंभ करायचा; पुढ्यांतील एकूणएक फाईल्स 'डिस्पोज ऑफ' करून टाकायच्या. ते खालीं बघून काम करत होते. आणि त्यांचे कान मात्र घड्याळांत एकाचा टोला ऐकण्यास आतुर झाले होते. ते वांकड्या तिकड्या अक्षरांत खर्डेघाशी करत होते...

वकीलवाडींतला श्रीकान्त कॉलेजमध्यें चाललेलं व्याख्यान ऐक-ण्याचा बहाणा करत नोटबुकांत पुष्पाला प्रेमपत्र लिहीत होता. त्यानं सकाळपासून दहा–पांच वेळां लिहिण्याचा प्रयत्न केला होता, पण कसं काय तें जमतच नव्हतं. त्यानं आजपर्यंत मिळवलेलं सारं ज्ञान पणाला लावलं होतं, पण छेः! तें साधं प्रेमपत्र लिहायला देखील तोकडं पडलं होतं– तसा मग तो स्वतःवरच चरफडावयास लागला, कागदावर फुल्या ओढावयास लागला...

मुलींच्या शाळेंत दहाव्या वर्गांत शिकणारी पुष्पा देखील अस्वस्थ होती. बाई अलजिब्रा शिकवत होत्या आणि ती मात्र इतिहासांतील चित्रांशीं चाळा करत होती, स्त्रियांच्या चित्रांना दाढ्यामिशा रंगवीत होती. पुस्तकाच्या पानावर श्रीकान्तचं नांव लिहीत होती आणि लगेच

खोवून टाकत होती. मैत्रिणींनीं बघितलं कीं काय म्हणून घाबरत होती आणि तरीहि कुणाचंच तिच्याकडे लक्ष नव्हतं...

पलीकडील घरांतील आंबटपणा वकीलवाडींत देखील पोंचला होता. पोरंसोरं नि नवरे घरांबाहेर निघून गेल्यामुळें बायकांचा वेळ जातां जात नव्हता. तोंड सुरसुरत होतं पण बोलण्यासाठीं कुणीच नव्हतं. शेजारणी–पाजारणींशीं चालणाऱ्या गप्पा संपल्या होत्या. बोलण्याचे दररोजचे ठराविक विषय संपले होते. मास्तरीणकाकू ताराबाई-कडे आल्या आणि मग त्या दोघींनीं वरच्या मजल्यावर राहणाऱ्या पुष्पाच्या आईची खूप टिंगल केली. त्या कुणांतच मिसळत नाहींत, यामागें कांहीं तरी रहस्य असेल अशी दोघींनींहि खात्री दिली–मग थोड्याशा सांसारिक गप्पा चालल्या. दिवाकरचं लग्न यंदा आहे कां नाहीं म्हणून ताराबाईनीं विचारणा केली, आणि त्यांच्या मुलाचं केव्हां आहे म्हणून मास्तरीणबाईनीं विचारलं. पलीकडच्या घरांत राहणाऱ्या राधाबाई कसलसं विणकाम घेऊन आल्या, आणि थोडा वेळ बायकांच्या अनिर्बंध गप्पांना आधण आलं. एवढ्यांतच 'गीतारहस्य' वाचतां वाचतां झोंपलेल्या मास्तरांनीं आपल्या पत्नीच्या नांवानें टाहो फोडण्यास सुरुवात केली. त्यांच्या छातींत कळा उठावयास लागल्या होत्या, त्या वेदनांनीं ते मोठमोठ्यानें कण्हत होते आणि गप्पांत रंगलेल्या मास्तरीणकाकू लगबगीनें आपल्या बिऱ्हाडाकडे निघाल्या–तसा मग ताराबाईंचा मघापासून धुमसत असलेला संताप परत उसळून आला. या नवरेशाहीची आतां मात्र त्यांना खरोखरीच चीड आली. अण्णा कांहीं कमीजास्त बोलूं लागले कीं, त्यांच्या टाळक्यांत लाटणं घालण्याचा त्या बेत आंखूं लागल्या–पण त्या असं कांहींच करूं शकत नव्हत्या. नवरा परत आला कीं त्याला चहा देणार होत्या, संध्याकाळीं जेवावयास घालणार होत्या आणि संसाराची सारीं कामें नेहमींप्रमाणेंच करणार होत्या. त्यांचे सिनेमा नटी होण्याचे बेत धुळीस मिळवलेल्या

साऱ्या समाजाचा त्यांना सूड उगवायचा होता. एकटे अण्णा त्यांच्या या महान् कार्यासाठीं अपुरे होते. वरच्या रेडिओवर लता मंगेशकरचं गाणं चाललं होतं आणि ताराबाई मात्र तें तुच्छतेनं ऐकत होत्या. त्या सिनेमांत गेल्या असत्या तर अशा छप्पन लता मंगेशकरांना आपल्या इथें नोकर ठेवूं शकल्या असत्या, साक्षात् गंधर्वांनींसुद्धां आपलं गायन बंद करावं-असं त्या गाणार होत्या-साऱ्या विश्वाला त्या भुलवूं शकल्या असत्या; पण दुष्ट लोकांनीं त्यांना संधि दिली नव्हती. त्या पुनश्च दांत-ओठ खावयास लागल्या-कुठला पराक्रम करावा ह्याचाच विचार करावयास लागल्या-मग त्यांना वाटलं आपण झांशीची राणी व्हावं आणि वकीलवाडींतील साऱ्या स्त्रियांची सेना उभारून नवरेशाहीला नेस्तनाबूद करावं...मुला-बाळांची, कुणाकुणाची तमा बाळगूं नये...

मुला-बाळांची आठवण होतांच त्यांनीं अभावितपणें घडयाळाकडे बघितलं. आतां फक्त तीनच झाले होते, सारी मंडळी परत येण्यासाठीं अजून तासादीडतासाचा अवधि होता. आल्याबरोबर त्यांना खाण्या-पिण्यास द्यावं लागेल याची त्यांना जाणीव झाली आणि मग त्या परत स्वयंपाकघरांतील कामाला जुंपून घेण्यासाठीं गेल्या. आतां रात्र पडेपर्यंत त्यांना विसांवा मिळणार नव्हता...

अविश्रांत धांवपळीनें पिचलेला रस्ता, अगदीं मेटाकुटीला आला होता-आकाशाच्या पोकळीवर सूर्य मात्र स्वस्थपणें रेंगाळत म्हशीच्या चालीनें पश्चिमेकडे जात होता. ऑफिसच्या नि शाळा-कॉलेजाच्या विश्वांत पुन्हां सुस्ती संचारली होती. दुपारीं घेतलेला गरम चहा पंख्याच्या वाऱ्यानें केव्हांच थंड पडला होता. टाईप करतांना थकून गेलेल्या दिवाकरनें एकदांच- अगदीं एकदांच आपल्या पलीकडे बसणाऱ्या लेडी क्लर्ककडे बघितलं होतं नि समाधान होईपर्यंत आजहि तो कांहीं तिच्याकडे बघूं शकला नव्हता. तिच्या ओंठावरील लिप्स्टिकचा लाल-भडक रंग त्याला डाळिंबाची आठवण करून देत होता आणि हंसतांना

दिसणारे पांढरे शुभ्र दांत आंतील बियांसारखें भासत होते. बस्स एवढंच! त्या डाळिंबाची गोडी चाखण्याचा विचार चुकून देखील त्याच्या मनाला शिवला नाहीं!

दामुअण्णा ऑफिसरकडे दोन-तीन वेळां गेले, पण त्याचा तो भयंकर चेहेरा बघतांच त्यांची नेहमींप्रमाणेंच त्रेधा उडाली. ऑफि-सरला बायको समजून खेंकसणं अत्यंत कठीण आहे, ह्याची त्यांना हज्जारव्यांदा जाणीव झाली... ते आपल्या या चमत्कारिक अवस्थेचा विचार करत काम संपवीत होते...

आणि कॉलेजांत सकाळपासून प्रेमपत्र लिहिण्यांत दंग झालेला श्रीकान्त अद्यापहि खट्टूच होता. त्याला कांहीं मनासारखं प्रेमपत्र लिहितां आलं नव्हतं. त्यानं सकाळपासून लिहिलेलीं सारीं प्रेमपत्रें टरकावलीं आणि ह्यावर काय उपाय करावा ह्याचाच त्याला विचार पडला होता... इतिहासाच्या पुस्तकांतील चित्रांची रंगरंगोटी संपल्या-नंतर पुष्पानें आपल्या इंग्रजी पुस्तकांतील साऱ्या लेखकांच्या फोटोंना आडवे-उभे गंध लावलें, स्त्रियांना-कुंकू लावलें आणि नंतर तेंहि पुस्तक संपलें, तरीहि तिचं समाधान झालं नव्हतं, अंतरांतून ती अस्व-स्थच होती!...

.प्रामाणिक घडयाळांत चारचे टोले पडले आणि साऱ्या विश्वानें समाधानाचा सुस्कारा सोडला. सकाळच्या प्रहरीं घडयाळावर संताप-लेल्या अण्णांना देखील ह्या वेळीं घडयाळाचा मनस्वी आनंद झाला. त्यांनीं आपल्या पर्शियन कोटांतून पॉकेटवॉच बाहेर काढलं नि प्रेम-भरानें त्याचं चुंबन घेतलं. बाजूचा कारकून त्यांच्या या कृतीवर खूप हंसला तरी त्यांना त्याचं कांहींच वाटलं नाहीं.

...दुसऱ्या टोंकाला पोहोंचलेली मध्यमवर्गाची लाट परत घराकडे निघाली आणि तुडवला जाणारा रस्ता पुन्हां दबावयास लागला, तिथं मात्र क्षणाचीहि उसंत नव्हती. शाळा-कॉलेजचीं मुलंमुलीं, ऑफिसचे

लोक परतावयास लागले आणि सकाळीं ओस पडलेली वकीलवाडी पुन्हां टवटवीत दिसूं लागली–पुन्हां चमत्कारिक आवाज निनादूं लागले. खंड पडलेल्या जीवनास पुन्हां प्रारंभ झाला. प्रत्येकाच्या घरीं एकच गोंधळ सुरूं झाला आणि सारेचजण एकमेकांवर चिडत, संतापत, प्रेम करत, जीवनांतील मजा लुटण्याचा बहाणा करूं लागले. दिवसभर घरांत कोंडलेली पेन्शनर पुरुषमंडळी देवदर्शनासाठीं घराबाहेर पडावयास लागलीं आणि थकून भागून आलेली मंडळी हाश्शहुश्श करत विश्रांति घ्यावयास लागली.

दुसरा दिवस रविवार होता, ह्याचा मध्यमवर्गाला मनस्वी आनंद झाला. उद्यां नुसती चैन करावयाची असा प्रत्येकानें निश्चय केला. दामुअण्णा देखील ताराबाईंना बरोबर घेऊन सिनेमाला जाण्याचें ठरवूं लागले, 'ताजमहाल' ला जेवण घेण्याचा बेत करूं लागले. मनांतल्या मनांत मात्र पैशाचा हिशेब करावयास लागले–आणि ते आपले ह्याच विचारांत गुंग होते. एवढी चैन झेपेल असं त्यांना वाटत नव्हतं आणि तरीहि तो विचार त्यांना सोडावासा वाटत नव्हता...दिवाकर संध्याकाळची संध्या करावयास बसला आणि आतांहि वरची बेबी त्याची मजा बघण्यासाठीं तिथं उभी राहिली होती आणि अशा कामासाठीं आपल्यावर वेळोवेळीं जुलूम करणाऱ्या मास्तरवर तो परत चिडावयास लागला...श्रीकान्तच्या नि पुष्पाच्या कसल्याशा खुणा सुरू झाल्या, आणि वकीलवाडींत लौकरच कसलं तरी वादळ होण्याचीं लक्षणें दिसूं लागलीं–वरच्या नि खालच्या मजल्यावर राहणाऱ्या दहा–पांच जणांनीं त्यांना खुणा करतांना पाहिलं होतं आणि त्यांच्या या अतिक्रमणावर सर्वच जळफळत होते...

मध्यमवर्ग रविवारचीं स्वप्नें रंगवत होता. सारी वकीलवाडी उद्यांचा कार्यक्रम आंखण्यांत तल्लीन होऊन गेली. उद्यांच्या विचारामुळें सारे जण आजचे परिश्रम विसरून गेले होते, कुणी सिनेमाला जाण्याचें

निश्चित करत होते, कुणी प्रदर्शन बघावयास जाणार होते, आणि उद्यांच्या ह्या गोष्टीसाठीं आजच गोंगाट करत होते, अगदीं बेभान झाले होते...

आणि पेन्शन घेऊन वृद्ध बनलेले मास्तर एकाएकीच लोळूं लागले, त्यांच्या छातींतील कळा मर्यादेबाहेर जात होत्या. त्यांच्या घरांत एकच गडबड उडून गेली होती. दिवाकर घाबऱ्या घाबऱ्या डॉक्टरांना बोलावण्यासाठीं गेला होता आणि मास्तरीणकाकू पांढऱ्या फटफटीत पडल्या, मनांतल्या मनांत ईश्वराचा धांवा करावयास लागल्या; पण या सर्वांचा कांहींच उपयोग नव्हता. मास्तरांनीं एकाएकीच डोळे पांढरे केले आणि कांहीं उपचार करावयाच्या आंतच त्यांचा सारा कारभार आटोपला. बाहेरून परतलेला दिवाकर अत्यंत घाबरला आणि तेवढ्यांतच मास्तरीणबाईनीं टाहो फोडला. रडण्याच्या आवाजांनीं सबंध वकीलवाडींतिल हृदयांस तडा पडला आणि तिथें एकच हलकल्लोळ उडाला. सर्वांची धांवपळ सुरू झाली. बाया-बापड्याचं रडणं सुरू झालं-हळहळ, सुस्कारे आणि प्रेत उचलायच्या भाषा सुरू झाल्या. पैशाची व्यवस्था होऊं लागली. कधीं न येणारी वरची बाईहि ताराबाईजवळ येऊन उभी राहिली आणि तिनें देखील तोंडाला पदर लावला- साऱ्यांची गति मंदावली, उत्साह मावळला आणि सारा जिवंतपणा मृत्युपुढें घोटाळावयास लागला. सकाळपासून प्रारंभ झालेल्या जीवनाच्या विशाल चक्राला एकदम हादरा बसला. वैयक्तिक हेवेदावे, प्रेम, उपहास, सारं कांहीं संपुष्टांत आलं होतं-मग मृत्यूच्या संस्कारांत मध्यमवर्ग दुःखित अंतःकरणानें भाग घ्यावयास लागला. तिथें एकदम उदात्तता आल्याचा भास झाला-

रात्रींचं आगमन होऊं लागलं आणि साऱ्या वकीलवाडीवर मृत्यूच्या छायेमुळें दाट औदासीन्य पसरलं. मास्तरांच्या जीवनांतला प्रकाश नाहींसा झाला होता, आणि प्रत्येकाला वाटत होतं कीं, आपलं जीवन-

सुद्धां असंच काळंकुट्ट आहे...यांत्रिकता, सूड, द्वेष, उपहास, किडलेल्या आशा आणि फडतूस मनोरथ–मनोरथांची चिता–मास्तरांची चिता–जिवंतपणाचा भडका–प्रेतकळा–गारठलेला विझलेला कोळसा–आयुष्यभर झिजवायचा नि शेवटीं...?

...त्यांच्या जीवनाचा उगाळलेला कोळसा रात्रीच्या काळया रंगांत मिसळत होता–मिसळत राहणार होता–आणि धुमसणारी अशांति अरुणाच्या लालिमेबरोबर भडकत होती...



# ४. निर्माल्य

शरद् बी. ए. पास झाला तेव्हांची गोष्ट. घरांतील एकूण एक मंडळी आनंदांत होती. दादांना आपल्या आयुष्याचं सार्थक झाल्याप्रमाणें वाटलं, मंदाकाकूंना अस्मान ठेंगणं वाटावयास लागलं, त्यांनीं दोनतीन वेळां शरद्‌ची दृष्ट काढलीं! शरद् मित्रांचीं अभिनंदनें स्वीकारीत होता, सर्वांना पेढे देत होता, मध्येंच कुणाच्या तरी थट्टेनें मोठमोठ्यानें हंसत होता.

दादांचे एक स्नेही गंभीरपणानें म्हणाले, "आपणांस असे साधे पेढे नकोत बुवा! लग्नाचे लाडू लौकर मिळायला पाहिजेत"— आणि मग शरद् खूप खूप लाजला, तसे ते आपल्या फेंदारलेल्या मिशांतून खो ऽऽ खो ऽऽ करत हंसत सुटले...

— चंद्रभागाबाई हा सारा प्रकार स्वयंपाकघराच्या दाराआडून अवलोकीत होत्या. नातवाचं चाललेलं कौतुक डोळे भरून पाहत होत्या, सुनेच्या धांदलीवर मनांतल्या मनांत रागावत होत्या, आणि तरीहि त्या कांहींच म्हणत नव्हत्या. कुठल्या तरी देवीचं स्तोत्र त्या ग्रामोफोनच्या रेकॉर्डप्रमाणें बडबडत होत्या— एवढ्यांतच धाकटा अवि बूट घालून स्वयंपाकघरांत आल्यामुळें, त्याच्यावर त्या खेंकावयास लागल्या— "साऱ्यांनीं मेला ताळतंत्रच सोडून दिला आहे!" त्यांच्या या कुरकुरण्याकडे लक्ष देण्यास कुणासच सवड नव्हती. त्यांनीं मंदाकाकूंना हांक दिली, आपल्या मुलाला— दादांना बोलावलं. पण छेः! सारं घर

जणुं ओस पडलं होतं– घरांतील हंसण्या खिदळण्याचे ध्वनि कोपऱ्या-कोपऱ्यांतून प्रतिध्वनित होत होते आणि चंद्रभागाबाईचा घसा कोरडा पडण्याची वेळ आली होतीं तरी त्यांची कुणी दखल घेत नव्हतं. त्यांच्या सर्वांगाची लाहीलाही झाली. "मेल्यांनो? फार दिवस नाहीं बरें, सूड घेणार तुमचा! देवा नारायणा! माझे म्हातारीचे डोळे कधीं एकदाचा कायमचे बंद करतोस कुणास माहीत! आतां नाहीं रे बाबा– आपल्याच्यानं जगणं होणार."

देवीचं स्तोत्र अर्ध्यावरच थांबवून त्या क्षणार्धांत जीवनविषयक विचारांत तल्लीन झाल्या आणि मग त्या एकदम चपापल्या. समोरील देवघराकडे भक्तिपूर्ण नजरेनें बघत त्यांनीं देवांना नमस्कार केला आणि साऱ्या अपराधांचं परिमार्जन झाल्याच्या आवेशांत परत स्तोत्र गुण-गुणण्यास प्रारंभ केला!

शरद्ची मित्रमंडळी शिऱ्या पोह्यावर ताव मारून निघून गेली, दादांचे स्नेही चालते झाले आणि सारं कुटुंब हळुहळूं आपल्या नियमित अवस्थेवर यावयास लागलं. मंदाकाकू आणि अलका बशा उचलावयास लागल्या, छोट्या अवीची धांदल मंदावली आणि आतां कुठें शरद्ला सवड मिळाली. तेवढ्यांतच दादांनीं आठवण करून दिली, "अरे शरद्! आजींना नमस्कार केलास का? ग्रॅज्युएट झालास म्हणजे कांहीं शिंगं फुटलीं नाहींत– जा, आजीला नमस्कार करून ये–"

शरद् अनास्था दर्शवीतच आंत आला आणि आजीला नमस्कार करून आशीर्वाद घेण्यासाठीं थांबला. चंद्रभागाबाई एवढा वेळपर्यंत ज्या क्षणाची उत्कंठतेनें प्रतिक्षा करत होत्या, तो क्षण आतां आला होता. शरद् पास झाल्याची बातमी त्यांना मघाशीच समजली होती, त्या स्वतःहून शरद्चं कौतुक करण्यासाठीं दोनतीन वेळां त्याच्या खोली-पुढें जाऊन आल्या होत्या; पण मित्रपरिवाराच्या घोळक्यांत तो दंग होता–आजी म्हणजे त्याच्या लेखीं घरांतील डांसासारखी क्षःपदार्थ

होती. गेल्या तीनचार तासांत तो पंधरा वेळ तरी आजीसमोरून गेला होता, पण एका साध्या शद्बानें सुद्धां त्यानं कांहीं सांगितलं नव्हतं. तसं मग चंद्रभागाबाईंना मनस्वी वाईट वाटलं. आपल्या अस्तित्वाला कांहींच किंमत नाहीं, या विचारानें त्यांना खचल्यासारखं वाटलं. तो आतां येईल, मग येईल या विचारांत त्यांनीं देवीच्या स्तोत्राची दोन पारायणेंहि करून टाकली, परंतु तो आला नव्हता आणि कदाचित् येणारहि नव्हता...

दादांच्या इच्छेखातर का होईना, तो आजीच्या पायां पडला. आजी आपल्या खोल आवाजांत आतां आशीर्वाद देईल–मग आशीर्वाद देईल, या विचारानें तो थोडा वेळ तिथंच घुटमळला–आणि चंद्रभागाबाई मात्र शांत होत्या, आशीर्वादाचे साधे औपचारिक शद्बदेखील त्यांच्या तोंडावाटें बाहेर पडत नव्हते. त्यांची जीभ जड झाल्याचा त्यांना भास झाला– त्या अडखळल्या, बोलण्याची मनस्वी इच्छा असतांना देखील त्या बोलूं शकत नव्हत्या आणि मग त्यांची दृष्टि एकदम देवघरापुढें पडलेल्या निर्माल्याकडे गेली. वाळलेल्या पानाफुलांचा ढिगार– नसती अडगळ– तिथून काढून टाकायला हवी होती, फेंकून द्यावयाची होती– मात्र साधा कचरा म्हणून नव्हे तर पवित्र अंतःकरणानं– क्रिया एकच, पण भावना निराळ्या; कृति तीच पण हेतु विभिन्न!

त्या आपल्या संपूर्ण आयुष्याचा विचार करावयास लागल्या– जीवनाचं अफाट पटांगण त्यांच्या अधु झालेल्या डोळ्यांना संपूर्णपणें दिसणं शक्यच नव्हतं. अंगावरील धाबळीइतकीच त्यांची बुद्धि जीर्णशीर्ण झाली होती. आठवणींचे धागेदोरे अद्याप तुटकतुटकपणें लोंबकळत होते...

शरद् तणतणत बाहेर निघून गेला. आजी हें सारं बघत होत्या, परंतु जागृत झालेलं विचारांचं वादळ, त्यांना कांहींच सुचूं देत नव्हतं. त्यांची स्थिति बंद खोलींत कोंडलेल्या माणसासारखी झाली होती.

मंदाकाकू चुलीजवळ आवराआवर करीत हें सारं बघत होत्या. चन्द्रभागाबाईनीं कांहींच शद्ब तोंडावाटें बाहेर काढले नाहींत हें त्यांना खुपलं, "ही काय मेली रीत झाली! लेंकरूं नमस्कार करायला आलं, त्याला साधा आशीर्वाद दिला असतां तर कांहीं खर्चलं असतं वाटतं?" आजींना आपली चूक उमगली, त्या जागच्याजागींच चुळबुळल्या, अस्वस्थ झाल्या, आणि आपल्या पदरानें डोळयांच्या ओल्या कडा पुसावयास लागल्या. सूनबाईला कांहींतरी सांगावंसं त्यांना वाटूं लागलं—मनांतला कोंडमारा त्यांना व्यक्त करावसा वाटला— पण त्यांच्यांतील सासू एकदमच जागीं झाली आणि मग त्यांनीं तोंडाची चक्की सुरू केली—"माणूस गप्प बसतं तों तों यांचीं खुळं वाढतच चाललीं! म्हणे आशीर्वाद दिला नाहीं. हो, हो, नाहीं द्यायची. खबरदार! मला जर कांहीं कुणीं बोलेल— सारे मेले मला धारेवरच धरतात— नाहीं रे हा छळ सहन होत, देवा नारायणा!"

स्वयंपाकघरांतील आरडाओरडा ऐकून दादा आंत आले— "काय झालं?" म्हणून त्यांनी चौकशी केली. चन्द्रभागाबाईनीं सुनेच्या पर्वतप्राय अपराधांचा पाढा वाचला, तरीहि दादांनीं आपल्या पत्नीला एका साध्या शद्बानें सुद्धां दुखवलं नाहीं; उलट आपल्या कपाळावरील आठ्यांचं जाळं जास्तीच वाढवीत, म्हातारीला सुनावलं, "तुझं आपलं कांहींतरीच आई! काय म्हणाली ती तुला? साधा आशीर्वाद कां दिला नाहीं, म्हणूनच विचारलं ना? यांत तीच चुकली वाटतं— कमाल आहे बुवा तुझी!"— तशा मग चन्द्रभागाबाई फुरंगटून बसल्या. त्यांनीं आतांच वांचून संपविलेल्या देवीच्या स्तोत्रांतील देवीचा चेहेराच त्या आठवावयास लागल्या. तिचे ते आठ हात आणि चार तोंडें, नररुंडांची गळयांतील माळ— आणि हातांतील आयुधं! क्षणभर त्यांना वाटलं कीं, आपणहि असाच चंडीकावतार धारण करावा आणि कुटुंबांतील एकूण एक व्यक्तीला आपल्या अचाट सामर्थ्यानं थक्क करावं— सुनेला कांहीं-

तरी शाप द्यावा— आणि शरद्ला नापास करावं— बूट घालून आपणांस शिवणाऱ्या अविनाशला एक चपराकच ठेवून द्यावी...

त्या आपल्या या दिवास्वप्नांत दंग झाल्या आणि एक एक सिनेमा बघूं लागल्या. सारे लोक आपणांस शरण आले आहेत नि करुणा भाकत आहेत— आपला क्रोध शांत झाला आहे— आणि आपण वरदान करीत आहोंत— शरद् आपणांस असंच दरवर्षी पास करण्याची प्रार्थना करीत आहे आणि दादा भरपूर संपत्ति मागत आहेत— कुणाचीच मनःकामना त्या पूर्ण करणार नव्हत्या. सारे लोक स्वार्थी आहेत; काम पडलं म्हणजे पुढें पुढें करतात— येरव्हीं साधी विचारपूस देखील करीत नाहींत. शरद् पास झाल्याचा त्यांना आनंद झाला नव्हता, असं थोडंच होतं! उलट सर्वांपेक्षां त्यांनाच त्याचं जास्त कौतुक वाटलं होतं— दुपारीं पुराणासाठीं राममंदिरांत गेल्या म्हणजे भागीरथीबाईंना नि गंगूबाईंना आपल्या नातवाचा पराक्रम त्या सांगणार होत्या, त्यांच्यापेक्षां आपण जास्त भाग्यवान् आहोंत हें सिद्ध करणार होत्या—

पण शरद्नें त्यांची घोर निराशा केली होती. त्यानं सर्वांआधीं आपल्यापाशीं यावं, जवळ बसावं— अगदीं लहानपणच्या सारखं बिलगावं, आणि त्यावेळीं जसा तो आपलं प्रत्येक गुपित आजीजवळ सांगत असे तसंच आतांहि करावं— ही त्यांच्या अंतरीची व्यथा होती. पण नेमकं हेंच सुख त्यांच्या नशीबांत नव्हतं. काळाच्या एकेका पावलागणिक त्यांच्या नि सभोंतालच्या व्यक्तींत एक अदृश्य भिंत उभी राहत होती; जगाचं सारं स्वरूप हळुहळूं बदलत होतं आणि चन्द्रभागाबाई-मध्यें मात्र कुठलेच नवीन बदल होत नव्हते. शरद्च्या बाळपणींहि त्या म्हाताऱ्याच होत्या आणि आज शरद् तरुण झाला होता, तरीहि त्या म्हाताऱ्याच राहिल्या होत्या. काळाचं गतिचक्र त्यांच्या बाबतींत स्थिरावलं होतं, आणि इतरांच्या बाबतींत मात्र गतिमान् झालं होतं. शरद्वर तारुण्याचा प्रभाव होता, त्याच्या पाठोपाठ जन्मलेली

अलकाहि दिवसेंदिवस मोठीच दिसावयास लागली होती. या सर्वांमध्यें नुसते साधे शारीरिकच बदल होत नव्हते तर अगदीं मुळापासून ते निराळे होत होते...

आणि चन्द्रभागाबाई या कोडयांत गुंग होत्या. काळाची ही गति सहन करण्याचं त्यांच्यांत सामर्थ्य उरलं नव्हतं- वृद्धत्वामुळें भोळया बनलेल्या त्यांच्या मनाला उगाच तरी वाटायचं कीं सृष्टीच्या क्रमांत कांहींच बदल होऊं नयेत? पण हें कसं व्हावं? या प्रश्नाचं उत्तर त्यांना सुचत नव्हतं- हा प्रश्नच मुळीं वेडा होता...!

त्या भुतानें झपाटल्यागत बाहेरच्या बैठकीच्या खोलींत आल्या आणि आपल्या नवऱ्याच्या फोटोकडे टक लावून बघावयास लागल्या. त्यांचं तें फोटोंत साठविलेलं भव्य आणि गंभीर व्यक्तिमत्व, त्यांची करारी मुद्रा आणि निश्चलता-ह्या साऱ्या गोष्टीं तिथं अनेक वर्षांपासून वास करत होत्या आणि अजून अनंतकाळपर्यंत टिकणार होत्या- तसा मग त्यांना त्यांचा राग आला. त्यांच्या स्वतःसारखं मानहानीचं जिणं कंठायला ते आज जिवंत नव्हते, याचं त्यांना वाईट वाटलं. हा सारा वनवास त्यांच्या एकटयाच्याच नशीबीं कां?

त्यांनीं आपली नजर खोलीच्या दुसऱ्या टोंकाला वळविली. कोपऱ्यांत त्यांच्या पूर्ण कुटुंबाचा फोटो होता. सहा वर्षांचा दादा त्यांच्या पुढ्यांत उभा होता. दागदागिन्यांनीं मढविलेली त्यांची छबी तिथं अस्तित्वांत होती. त्यांनीं नकळतपणें आपल्या अंगावरील रखरखीत घाबळीवरून हात फिरविला, त्यांना आपला स्वतःचाच फोटो सवतीसारखा भासावयास लागला. पूर्वीचं कांहीं कांहीं शिल्लक राहिलं नव्हतं. कंठलेलं आयुष्य एका दीर्घ स्वप्नाप्रमाणं वाटत होतं-तें मुळीं जीवनच नव्हतं-त्यांना एकामागें एक घटना आठवावयास लागल्या, त्या कल्पनातीत सुखावह होत्या. आजच्यासारखा फॅशनचा काळ नसतांनाहि त्यांचें तारुण्य कांहीं शिळोप्यांत गेलं नव्हतं-त्यांत भरपूर आनंदाचे

क्षण विखुरलेले होते.—वयाच्या चौदाव्या वर्षी त्यांचा विवाह झाला होता. एका प्रतिष्ठित श्रीमंत घराण्यांत त्या वधू म्हणून आल्या होत्या. सासू, सासरा दोघेहि अत्यंत मायाळू होते. नवऱ्याचंहि त्यांच्यावर मनस्वी प्रेम होतं. लग्नानंतर तीन चार वर्षांनींच त्यांच्या दादाचा जन्म झाला होता. सासूसासऱ्याला त्याचं भरपूर कौतुक वाटलं होतं...

त्यानंतर कांहीं काळानें त्यांच्या जीवनाचें दुसरें पर्व सुरू झालें होतें. त्या वेळची काळाची गति त्यांना हवीशी होती. दादा मोठा झाला होता, घरांत मंदाकाकू सून म्हणून आल्या होत्या आणि हळुहळूं घराचा संपूर्ण ताबा त्या घेत होत्या. चंद्रभागाबाईच्या आज्ञेनुसार त्या सारीं कामें करत होत्या, त्यांना वडिलकीचा मान मिळावयास लागला होता आणि त्या कारभारांत एक प्रकारचं सुख होतं...

अन् ज्या वडीलकीच्या तोऱ्यांत, त्या वावरावयास लागल्या होत्या, तो तोरा कांहीं काळानें नाहींसा झाला होता. त्यांच्या एका अवस्थेचा अंत झाला होता. एकाचा उत्कर्ष होत होता नि दुसऱ्याचा ऱ्हास होता. हेंहि क्रमप्राप्तच होतं, पण बुद्धि विचार करायला असमर्थ होती. त्यांची आमदानी संपुष्टात आली होती, मंदाकाकूंच्या रूपानें ती अजूनहि चालू होती, पण त्यांत मानहानि वाटावयास लागली होती. यावर काय उपाय होता ?

खंगत चाललेल्या देहाबरोबरच, सांसारिक अधिकार खंगावयास लागले होते. स्थिरावलेल्या जीवनाजवळ नव्यानव्या आशाहि बर्फ बनून गोठाळल्या होत्या—त्यांतच एक दारुण घटना त्यांनीं बघितली होती. त्यांना या संसाराच्या व्यापांत सोडून त्यांचा नवरा एकटाच परलोकीं निघून गेला होता—त्यांना मृत्यूचं तर दुःख झालंच, पण त्या स्वतः एकट्या जिवंत राहिल्या, ह्याचंहि परमदुःख झालं. नवरा जिवंत होता तोपर्यंत घरांत त्यांची प्रतिष्ठा होती. पण नवरा गेला आणि त्यांचं खऱ्याखुऱ्या अर्थानें सौभाग्य समाप्त झालं !

त्यांच्या अर्थहीन जगण्यास तेव्हांपासून आरंभ झाला होता. मरण येत नव्हतं म्हणून त्या जगत होत्या. प्रेमाचं एकमेव स्थान जीवनांतून नाहींसं झालं होतं. कृत्रिम उपायांनीं त्याची जागा भरून निघणं शक्यच नव्हतं. तसं बघितल्यास त्यांना कुठल्याच गोष्टीची उणीव नव्हती. मुलगा चांगला मिळवता होता, अधूनमधून त्यांची विचारपूस करीत होता, एका मर्यादित अर्थानें त्यांच्या आज्ञेत होता; पण हें सारं वर-करणी होतं– घरांत कुठल्याहि प्रकारची ढवळाढवळ करण्याचा त्यांना अधिकार नव्हता, सारखं एका कोपऱ्यांत 'हरि! हरि!' करीत बसायचं म्हणजे काय? त्यांच्या अस्तित्वाला कोपऱ्यांतील अडगळीपेक्षां जास्त किंमत नव्हती. 'मुलगा सुनेच्याच तंत्रानें वागतो,' हीं त्यांची प्रारं-भीची तक्रार होती. त्यामुळें त्या धुसफुसत असत– घराच्या नव्या राज्यां-तून जवळजवळ त्या पदच्युत झाल्या होत्या. त्यांना पेन्शन मिळाली होती.

ही विश्रांति त्यांना नकोशी वाटे. कामें करण्यांत त्यांनीं आपला देह कष्टविला होता, तिथं रिकामटेकड्याप्रमाणें कसं बसावंसं वाटेल? त्या स्वयंपाक करतें, म्हणायच्या, पण त्यांना कुणी करूं देत नव्हतं; घरांतील इतर कामासाठीं मजूर होते– तीं कामें देखील करण्याची त्यांची तयारी होती; पण त्यांनीं कांहींच करूंसवरूं नये असा सर्वांचा अट्टाहास होता. त्यांची तीर्थक्षेत्रांना जाण्याची इच्छा होती, पण त्यालाहि मुहूर्त लागत नव्हता!

अशा प्रकारच्या कोंडमाऱ्यांत त्याचं जीवन चाललं होतं.त्यांचं आयुष्य एखाद्या कैद्याप्रमाणें बनलं होतं. त्यांतून सुटका होण्याची शक्यता मुळींच संभवत नव्हती, आणि म्हणूनच त्या त्रागा करून जगत होत्या...

त्या तशाच भारावलेल्या अवस्थेंत परत स्वयंपाकघरांत आल्या, सारे लोक आश्चर्यानें त्यांच्याकडे बघावयास लागले. त्यांचा संताप परत उसळून आला– "मला वेड लागलयं काय? एवढं तोंडाकडे बघायला

काय झालं?– हो! हो! खरंच मला वेडच लागलं आहे– मी वेडी आहे– तुमच्याबरोबर तुमची इच्छा नसतांना राहतें, तुम्हां सर्वांवर प्रेम करतें–हा माझा वेडेपणाच आहे बरं–!" आणि मग त्या ओक्साबोक्शीं रडावयास लागल्या– डोकं बडवूं लागल्या.

"हें असं काय करतेयस ग आई–" दादा म्हणाले.

"कांहीं त्रास होतो का सासूबाई?" सूनहि तेवढ्याच प्रेमळपणानें उद्गारली.

"माझा राग आला कां आजी तुला?–" सर्वांत शेवटीं शरद् म्हणाला.

त्यांनीं अश्रुपूर्ण डोळ्यांनीं शरदूकडे बघितलं. त्यानं तोंड लहान केलं होतं, डोळे मात्र निष्पाप होते– आजी बराच वेळपर्यंत टक लावून त्याच्याकडे बघत होत्या– आणि मनांत मात्र कांहींतरी रूतत होतं.

नि मग त्यांना जाणीव झाली, आज आपणांस शरदूचा राग आला आहे. त्यांच्या डोळ्यांपुढून एकदोन आठवणीं तात्काळ सरकल्या. म्हातारपणींच्या मानहानीच्या प्रेमाविरहित काळांत त्या जगत असतांना शरद्चा जन्म झाला होता. त्या आजी बनल्या होत्या आणि ही कल्पना त्यांना सुखावह वाटलीं होतीं. कुठलेच पाश शिल्लक नव्हतें अशा काळांत शरद् जन्मला होता आणि त्यांच्यापाशीं वसत असलेलें सर्व प्रेम, सारी माया शरद्भोंवतीं केंद्रीभूत झाली होती. तो चंद्राप्रमाणें हळुहळूं वाढत होता आणि तों तों त्या त्याच्यावर अधिक अधिक प्रेम करावयास लागल्या– अगदीं आईपेक्षांहि जास्त!

तो लहान होता तेव्हां त्यांच्याच अंथरूणावर झोपे, त्यांच्यापाशीं अनेक हट्ट धरी, त्यांना भंडावून सोडे, आणि त्याच्या ह्या कृतीवर त्या खूष होत्या. शरदूनं नेहमीं असचं राहवं असं त्यांना वाटे.

पण काळ त्यास अनेक प्रकारांनीं मर्यादा घालत होता. शरद् मोठा-मोठा होत होता, घरांत अलका नि अविनाश दोन मुलें जन्मलीं होती

आणि आजींच्या मात्र हें हिशेबांतच नव्हतं. त्यांनीं या सर्वांकडे दुर्लक्ष्य केलं होतं. तीं सारींच आज वाढलीं होतीं, आणि आजी मात्र अजूनहि वीस वर्षांचाच काळ गृहीत धरून होत्या– तोच लहानपणीं आपल्यावर प्रेम करणारा शरद्...

आणि म्हणूनच आज सकाळपासून त्या उदास होत्या. शरद् पास झाला होता, त्यानं सर्वांआधीं आपणांस हें सांगावयास पाहिजे होतं, ही त्यांची इच्छा होती. पण त्याच्या तरुण मनाला म्हातारीची ही तळमळ कळावी कशी? त्यांच्यांत केव्हांच अंतर पडलं होतं....

एका विशिष्ट मर्यादेंत सर्वांचं त्याच्यावर अजूनहि प्रेम होतं– यांत मात्र शंका नव्हती. सारेजण त्यांच्याभोंवतीं घोळका करून उभे होते आणि चंद्रभागाबाई मात्र शून्यपणें देवघरापुढील सुकलेल्या पानाफुलांच्या ढिगाऱ्याकडे बघत होत्या– त्यांचं जीवनहि असंच निर्माल्यवत् बनलं होतं– निरस पण पवित्र– तें फेंकून देण्याच्याच योग्यतेचं होतं, पण साधा केरकचरा म्हणून नव्हे– साधी अडगळ म्हणून नव्हें–

या विचाराने त्यांना किंचित् समाधान वाटलं, आणि मग त्या दादाच्या चर्येकडें बघावयास लागल्या, सूनेकडे पाहूं लागल्या, तशीं मग त्यांना एकाएकीच जाणीव झाली कीं, दादांच्या चेहऱ्यावरहि वृद्ध-त्वाची कळा, आकाशांतील ढगांसारखी झांकळून यावयास लागली आहे. मंदाकाकूंचे केंसहि हळुहळूं पिकत आहेत–आणि मग त्या उगव-णाऱ्या पिढीकडे बघूं लागल्या–तिथं उत्साह नि आनंद फुलत होता. काळाच्या गतिमान् चक्रावरील अस्पष्ट दृश्यांकडे बघण्यांत त्या तल्लीन झाल्या–भरती आणि ओहोटीच्या लाटा त्यांच्या मनांवर आदळत होत्या–आणि त्यांना अगदीं हलकं हलकं वाटावयास लागलं...

✤ ✤ ✤

# ५. अधिकार

चन्द्रकान्तराव आपल्या मोटारींतून खालीं उतरले. आणि कारकुनांचे नि चपराशांचे मुजरे स्वीकारीत मोठ्या रुबाबानें आपल्या चेंबरकडे वळले. अर्धवट उघडया दारांतून ते आतां आपल्या बसण्याच्या जागीं पोंचणार होतें तिथलं तें मोठ टेबल, इझी चेअर, विजेचा पंखा, टेबलावरील फाइल्सचा ढिगार, भिंतीवरील निरनिराळे चार्टस आणि नकाशे, हें सारं त्यांच्या दृष्टीपुढें येत होतं नि त्यांचं त्यांना समाधान वाटलं. आपल्या वैभवावर ते स्वतःच मोहित झाले व ओंठांतल्या ओठांत हंसले. एकदम त्यांची दृष्टि दारावरील स्वतःच्या नांवाच्या बोर्डकडे गेली आणि ते चपापले छोट्याशा पितळी बोर्डवरील काळींठळक अक्षरें-त्यांनीं मुद्दामच हा बोर्ड तयार करवून घेतला होता "चन्द्रकान्तराव एम्. ए. असिस्टंट डायरेक्टर." आणि मग त्यांनीं एक थंड निःश्वास सोडला. मनांतल्या मनांत आपल्या नोकरीचीं वर्षें मोजलीं, अजून तीन वर्षांनी त्यांना पेन्शन मिळणार होती. तसें मग ते जास्तच अस्वस्थ झाले विचार करतच आंत शिरून आपल्या खुर्चीवर बसले...

नेहमीच्या पद्धतीप्रमाणें त्यांनीं सर्व खोलीभर नजर फिरविली, टेबलावरचं बटन दाबलं नि अंतराळांत विजेच्या घंटीचे पडसाद निनादले. आपला फेटा व बेल्ट सांवरीत गंगाराम शिपाई आंत आला. त्यानें लवून मुजरा केला पण साहेबाचं त्याच्याकडे लक्ष नव्हतं. तो हुकुमाची वाट बघत होता, आणि साहेबांना हेंच समजत नव्हतं कीं आपण

याला कशासाठीं बोलावलं आहे? कांहीं तरी हुकूम देणं आवश्यक वाटल्यामुळें त्यानी थोडयाशा रागीट आविर्भावांतच सांगितलें, "थर्मासमध्यें कॉफी आहे ना, एक कप आण बघूं" गंगाराम निघून गेला, पुन्हां शांतता प्रस्थापित झाली. त्या विपण्ण शांततेंत खोलींतील साऱ्या वस्तु– नकाशे, चार्टस, तसबिरी, कॅलेंडर्स हलत असल्याचा त्यांना भास झाला.

या हलणाऱ्या सृष्टीवर, आपला सबंध भूतकाळ नि भविष्यकाळ हलतो आहे असं त्यांना वाटावयास लागलं. त्यांच्या स्मृतींचा सागर अचानकच उफाळला अन् हिंदकाळणाऱ्या लाटांवर एक एक दृश्य त्यांच्या दृष्टीपुढें साकार होऊं लागलं. त्यांना आपल्या नोकरीचा बावीस वर्षांचा काळ आठवला. दोनशे रुपये पगारापासून ते आज हजारपर्यंत चढले होते. ज्या संपत्तीसाठीं सबंध आयुष्य खर्ची पडतं. त्यासाठींच त्यांनींहि आजपर्यंतचं आपलं आयुष्य खर्ची घातलं होतं आणि तरीहि समाधान, मानसिक सुख, आणि शांति अजूनहि त्यांच्यापासून दूरच होती. तसा मग त्यांना आचंबा वाटला! व्यवहारी जग ज्याला सुखी जीवन म्हणतं तसलं जीवन ते जगत नव्हते का? त्यांचा स्वतःचा राहता मोठा बंगला होता, सुविद्य पत्नी होती, दोन मुलें कर्तबगार झालीं होतीं. एक इंजिनिएर नि दुसरा डॉक्टर– फक्त एका मुलीचं अद्याप लग्न व्हायचं होतं, पण त्यांतहि कांहीं कठीण नव्हतं. बॅंकेंत भरपूर पैसा होता, पोर सुंदर होती, लग्नबाजारांत हां हां म्हणतां खपण्यासारखी होती– पण तिचीच अद्याप लग्न करण्याची इच्छा नव्हती. गेल्याच वर्षी त्यांनीं तिला यासंबंधीं विचारणा केली होती. पण शिक्षण झाल्याखेरीज लग्न करायचं नाहीं असं तिनं सरळ सांगून टाकलं होतं– तोहि प्रश्न नव्हता.

अंतर्मनांत खळबळ माजली होती. कांहीं तरी सारखं बोंचत होतं, पण नेमकं काय आहे हेंच त्यांना समजत नव्हतं.

गंगारामनें भरून ठेवलेल्या कॉफीच्या कपाचा ते घोट घेत होते, नि डोळे मात्र फाइल्स वाचण्यांत गढून गेले होते, हात यांत्रिकपणें मधून मधून शेरे लिहीत होते, सह्या ठोकीत होते आणि हें सारं नित्या-प्रमाणें चाललं असतांना मन मात्र ठिकाणावर नव्हतं- असं कां होत आहे याची त्यांना कांहींच कल्पना करतां येईना.

उजवा हात लुळा असलेला हेडक्लर्क आंत आला. कुठल्यातरी महत्त्वाच्या केसवर 'डिसकशन' झालं, आणि तरी तो जागचा हलेना. तिथंच घुटमळूं लागला, मग साहेबांनी एक प्रश्नार्थक कटाक्ष त्याच्याकडे टाकला.

"साहेब! मुलीचं लग्न आहे घरीं- एक महिन्याच्या रजेची आवश्यकता होती-" तो खालीं बघावयास लागला- तो किती तरी घाबरला होता. त्याच्या कपाळावर घामाचें थेंब डबडबले होते. चंद्रकान्तरावांना याची मोठी मजा वाटली, आणि त्याच्या या भित्र्या नि नेभळट वृत्तीचा रागहि आला. कारकुनांची ही वृत्ति त्यांना कांहीं अपरिचित नव्हती. पण त्यामागील रहस्याचा आजपर्यंत त्यांना पत्ता लागला नव्हता, आणि त्यांनी ह्याचा कधीं विचारहि केला नव्हता. वाघाला घाबरणं हा जसा शेळीचा धर्म असतो अगदीं त्याचप्रमाणें दोन पाय असणारा एक मानवी प्राणी दीनवाणी मुद्रा करून उभा होता, एवढ्यांतच त्यांच्यांतील पारंपारिक अधिकारी जागा झाला. ते एकदम खेंकसले, "सध्यां रजा मिळूं शकणार नाहीं सेक्रेटरीएटच्या कित्येक केसेस पेंडिंग पडल्या आहेत. तुमचं राहणं आवश्यक आहे. I am sorry!"

तो तसाच खट्टू चेहरा करून आपला लुळा असलेला उजवा हात हालवीत परत गेला.

जाते वेळीं त्याचा झालेला कष्टी चेहरा आणि दौर्बल्याची छटा, या दोहोंचा झालेला मिलाफ त्यांनी अवलोकिला आणि परत त्यांना कसंसंच झालं. माणुसकी असलेलं अंतःकरण आंतून तडतडत होतं, नि

अधिकाराच्या धुंदीनं गर्विष्ठ बनलेलं मन त्याला पुढें सरूं देत नव्हतं. एक वेळ त्यांना पुन्हां वाटलं कीं, हेडक्लर्कला बोलवावं आणि त्याला हवी असलेली रजा देऊन टाकावी, परंतु त्यांनी कसलीहि हालचाल केली नाहीं. मनाच्या टोंचणीला सारखं मागें रेटीत ते एक एक फाइल पुढें ओढूं लागले.

भिंतीवरील टिक् टिक् करणाऱ्या घड्याळानें त्यांचं चित्त वेधलं, आणि एकाएकीच त्यांना वाटावयास लागलं, घड्याळाचे काटे गंजले आहेत, आंकडे पुसट झाले आहेत, आज बावीस वर्षांपासून तें यंत्र नियमितपणें चाललं होतं, कुठें बिघाड नाहीं कांहीं नाहीं. त्यांचं जीवनहि या घड्याळाप्रमाणेंच यांत्रिक नव्हतं का? दहा तें पांच कचेरी, अधूनमधून दौरे, 'कॉन्फीडेनशीअल' साठीं वरच्या साहेबांकडे जायचं त्यानंतर घर आणि संसार एवढे सारे व्याप त्यांना अवघ्या चोवीस तासांत करावे लागत होते. घटकाभराची उसंत मिळत नव्हती. गेल्या किती तरी दिवसांपासून भगवद्‌गीता वाचण्याचा त्यांचा विचार होता, पण ती उघडण्यास त्यांना कधीं सवड झाली नव्हती आणि ती या जन्मीं तरी मिळेल का नाहीं, सांगतां येत नव्हतं तसं मग एक विचित्रच दृश्य त्यांच्या दृष्टीपुढें तरळूं लागलं. काळाचे भयंकर हात त्या घड्याळाला आपल्या जाड जाड मुठींत पकडून दाबून टाकत आहेत... त्यांतील एकूण एक अवयव निखळून पडत आहेत... खळकन् कांच फुटत आहे नि आंतले काटे आपल्या रोखानें फेंकले जात आहेत, आपल्या डोळ्यांत शिरत आहेत, बालकमानीची पट्टी आपल्याभोंवतीं विळखा घालत आहे व स्क्रू नाकातोंडांत शिरत आहेत...

त्यांनी हातापायाला एकदम झटका दिला, नेकटाय जराशी ढिली केली आणि घाबरून विजेच्या घंटीचं बटन दोन वेळां दाबलं. दोन वेळां घंटी वाजली आणि नियमाप्रमाणें त्यांचा स्टेनोटायपिस्ट नायडू

डिक्टेशनसाठीं आंत आला, तेव्हां कुठें चन्द्रकान्तरावांना आपली चूक उमगली, आणि ते परत विचारमग्न झाले.

ते कांहीं तरी डिक्टेशन सांगणार होते एवढ्यांतच लेडीक्लर्क "May I come in Sir" म्हणत दारांत उभी राहिली, तसा मग त्यांना एकदम धीर आला. तिच्या या नाजूक शद्बांनी त्यांना एकदम स्फूर्ति मिळाली. "Yes! come in" म्हणत त्यांनी तिचं स्वागत केलं. त्यांचं हें टराविक होतं, ताटकळत उभ्या असलेल्या नायडूला न जुमानतां ती साहेबाच्या डाव्या हातालगतच्या खुर्चीवर बसली नि आपल्या तांबडयालाल नखांशीं उगाच तरी चाळा करावयास लागली.

नायडू आला तसाच परत निघून गेला, आणि इकडे आंत साहेबांच्या नि लेडीक्लर्कच्या गप्पांना आधण आलं. वास्तविक म्हणजे लक्ष्मीराज लेडीक्लर्क ही एका सुखवस्तु घरांतील पदवीधर बाई होती. वय असेल सुमारें तिशीच्या आसपास, पण नवऱ्यानें तिला सोडून दिल्यामुळें वेळ घालवण्यासाठीं म्हणून ती नोकरींत शिरली होती. साऱ्याच ऑफिसर्सशीं ती अशीच सलगीनें वागे आणि दुसरं म्हणजे तिला 'क्लर्क' पेक्षां 'लेडी' म्हणूनच जास्त महत्त्व होतं. इतर वेळीं हाताखालच्या कारकुनांवर खेंकसणारा, लुळा हेडक्लर्क या भवानीसमोर अगदीं गोगलगाय बनत असे. तिच्या त्या गोऱ्यागोमट्या नि वयोमानामुळें सुटत चाललेल्या शरीरावर, साहेबाच्या अस्तंगत होऊं घातलेल्या वासना घुटमळत असतात; ह्याची त्याला जाणीव होती. प्रौढावस्थेंतला तिचा नखरेल गिर्रेबाजपणा कुण्या वेळीं कुणावर घाड आणील याचा कांहींच नेम नव्हता, आणि म्हणूनच ती एखाद्या सम्राज्ञीच्या आवेशांत साऱ्या ऑफिसभर मिरवत असे; नि ती चालली म्हणजे सारी कारकूनमंडळी श्वास रोखून तिच्या पदन्यासाकडे व रंगलेल्या तिच्या थोंबाडाकडे भीत भीत बघत असत.

साहेब आणि ती खदूखदून हंसावयास लागलीं. नायडूनें आपल्या

पलीकडे बसलेल्या देशपांडे कारकुनाला कांहीं तरी खूण केली. त्यानें निर्विकारपणें शून्यांत बघितलें. यांत काय नवीन आहे असंच जणूं त्याला सुचवायचं होतं. त्याचं आणि लक्ष्मीराजचं टेबल अगदीं जवळ जवळ होतं, ती देशपांडेच्या हाताखालींच काम शिकत होती आणि ऑफिसांतील सारी मंडळी त्याला भाग्यवान समजत होती, पण हा त्यांचा गैरसमज होता. देशपांडेला लक्ष्मीराजची प्रत्येक बाबतींत शिसारी येत असे. तिचा तो रंगवलेला चेहरा, फॅशनच्या नांवाखालीं केलेलं अंगप्रत्यंगाचं प्रदर्शन, कारकुनीच्या नोकरींत राहूनहि तिचा तो श्रीमंती भपकेबाजपणा, ऑफिसरांशीं लगट-यांतलं कांहीं कांहीं त्याला आवडत नव्हतं आणि म्हणूनच कामापलीकडे तो तिच्याबरोबर क्वचितच बोलत असे. कित्येक गोरगरीबांना आणि पदवीधरांना पोटासाठीं आवश्यक असलेली नोकरी मिळत नव्हती आणि वेळ घालवण्यासाठीं एक हक्क प्राप्त करून बसलेल्या ह्या बाईचा त्याला साहजिकच द्वेष वाटत असे.त्यानें भीडभाड सोडून चार-दोन वेळां तिला सारं सुनवायलाहि कमी केलं नव्हतं. याचा परिणाम एवढाच झाला होता कीं, तिच्या सांगण्याहून कारण नसतांनाहि त्याला ऑफिसर्सचीं बोलणीं खावीं लागलीं होतीं, आणि मनुष्य वासनेच्या आहारीं जाऊन काय काय करूं शकतो, एवढं त्याला बघायला मिळालं होतं. तो तिच्यावर नेहमींच संतापलेला असे.

आतांहि तेंच झालं.साहेबांनीं शिपायाकरवी देशपांडेला आंत बोलावलं, आणि त्याच्या एक–दोन फाइल्स अंगावर भिरकावीत 'Damnfool' वगैरे मुक्ताफळें उधळलीं. हें सारं त्यानं निमूटपणें सहन केलं. उपहासानें बघणाऱ्या लक्ष्मीराजची त्यानें दखलहि घेतली नाहीं. एवढ्यांत साहेब परत गुरगुरले, " हें पाहा मिस्टर देशपांडे! तुमचं काम मुळींच सॅटिसफॅक्टरी नाहीं. किती गोंधळ घातला आहे या फाइल्समध्यें– अशानें तुमची नाइलाजानें हेड ऑफिसमधून बदली करावी लागेल! त्या फाइल्स व्यवस्थेशीर करा–आणि बरें का, मिसेस् राजचं डोकं दुखत

असल्यामुळें त्या घरीं जात आहेत, त्यांचंहि काम तुम्हीच बघा, जाऊं शकतां तुम्ही--" देशपांडे बाहेर आला. कुठल्याच भावना त्याच्या चेहऱ्यावर नव्हत्या. कान देऊन उत्सुकतेनें ऐकणाऱ्या कारकुनाकडेहि त्यानं बघितलं नाहीं. तो मुकाटपणें आपल्या टेबलशेजारीं येऊन बसला.

लक्ष्मीराज साहेबाच्या चेंबरमधून बाहेर पडली. तिनें चोपडलेल्या सेंटसूचा घमघमाट वातावरणांत भरला. तिनें सिल्कच्या हातरुमालानें आपले रंगवलेले ओठ हलकेच टिपले. त्यांवरचा रंग विखुरला होता!... ह्याच गोष्टींचा विचार आंतल्या खोलींत साहेबहि करत होते. इतर कारकुनांवर जसं आपण सहजासहजीं गुरगुरतों, तसं आपण लक्ष्मीराजसमोर कां करूं शकत नाहींत ?... अगदीं पहिल्याच परिचयांत त्यांनीं तिच्यासमोर नांगी टाकली होती. तिच्या लाडीगोडीनें बोलण्यावर ते फिदा झाले होते. नाहीं तरी यापुढें त्यांचं असं कितीसं जविन राहिलं होतं ? तशी मग त्यांना एकदमच, आपल्याचप्रमाणें वार्धक्यांत पदार्पण केलेल्या पण नेहमीं समाधानी असणाऱ्या पत्नीची आठवण झाली. आपलं लेडीक्लर्कबरोबरचं नातं घरीं जर बायकोला समजलं तर काय वाटेल तिला ?...

मग तिची सोज्ज्वल मूर्ति त्यांच्या पुढ्यांतल्या कॅलेंडरवरील चित्रांतल्या बाईसारखी दिसूं लागली. ती कॅलेंडरचीं पानें सतत मागें मागें नेत असल्याचं त्यांना दिसलं. ती आजपासून त्यांना तीस वर्षें मागें नेत होती, त्याच वेळीं त्यांचं लग्न झालं होतं. विद्यार्थीदशेतला काळ होता त्यांचा तो. शिक्षणासाठीं वडिलाजवळ पैसा नव्हता, अशा बिकट परिस्थितींत, सासऱ्यानें शिक्षण देण्याचं कबूल केल्यामुळें त्यांनीं लग्न केलं होतं. आजचं त्यांचं सुखी जीवन बनवण्यांत बऱ्याच प्रमाणांत त्यांच्या गृहलक्ष्मीचा वांटा होता. त्यांचा चेहरा नकळत अपराध्यासारखा पडेल झाला, आणि मग ते आपल्या पत्नीची क्षमा मागूं लागले, तिच्यापुढें हेडक्लर्कसारखे घुटमळूं लागले, असलं पातक परत करणार नाहीं म्हणून कबुलीजबाब देऊं लागले.

आपला इंजिनियर झालेला वडील मुलगा, धाकटा डॉक्टर, कॉलेजला शिकणारी प्रभा, सारा सारा परिवार आपला उपहास करत आहे असं त्यांना वाटावयास लागलं. परत ते करारी बनण्याचा प्रयत्न करावयास लागले. या साऱ्या लोकांना काय म्हणून घाबरायचं? ओरडा करायचा यांना काय अधिकार आहे? आपली वर्तणूक तर मानवी स्वभावाला सोडून नाहीं ना? सर्वांसाठीं आपण मरमर मरायचं, आणि आपल्याला मात्र स्वातंत्र्य नाहीं! परस्त्रीशीं आपण संबंध ठेवला, तर बायकोला हाकलायचा काय हक्क आहे? जन्मभर तिच्याशींच एकनिष्ठ राहावं असं कांहीं ब्रीदवाक्य आहे काय?

तें कांहीं नाहीं घरच्या साऱ्या मंडळीला ऑफिसांतील कारकुनांप्रमाणें वागवायचं असं त्यांनी ठरवलं. उद्यां लक्ष्मीराजला बंगल्यावर घेऊन जायचं. जमलंच तर प्रयत्न करून तिला ऑफिसांत परमनंट करायचं. जागा नसेल तर देशपांडे कारकुनाला डिसमिस करायचं. नाहीं तरी तो जरा शेफारल्याप्रमाणेंच वागतो आणि परवांच वर्तमानपत्रांत त्या गाजलेल्या रजिस्टर मॅरेजसारखं आपणहि लक्ष्मीराजबरोबर लग्न करायचं. मग वर्तमानपत्रांत आपलेहि फोटो झळकतील. आपलं तसं वयहि कांहीं विशेष नाहीं. अतिपरिश्रमामुळें डोक्यावरील केस पांढरेशुभ्र झाले आहेत एवढंच! पन्नाशीची झुळूक म्हणजे फार वय आहे काय?

मग ते लग्नाचा प्लॅन आंखूं लागले. परत स्वतःशींच खूष झाले. ते साऱ्या स्टाफला जंगी पार्टी देणार होते. याच गडबडींत सर्वांना हवं असेल तें देणार होते.

उजवा हात लुळा असलेला हेडक्लर्क आंत आला, आणि त्यांनीं त्याला स्वतःहून विचारलं, 'मिस्टर पाटील, तुम्हाला रजा हवी म्हणाला होतां ना? कुठाय् ॲप्लीकेशन्? द्या बघूं इकडे, मी सँक्शन करतों.'

हेडक्लर्कला साहेबांतील या आकस्मिक बदलाचं नवल वाटलं. क्षणभर त्याचा विश्वासच बसेना. मग त्यांनीं खणणण् घंटी वाजवून देशपांडेला

आंत बोलावलं,'हें पाहा, देशपांडे, हेडक्लर्क पाटील रजेवर जात आहेत. त्यांच्या जागीं मी तुम्हाला टेंपोररीली प्रोमोट करतों. काम व्यवस्थेशीर चाललं आहे ना?'

देशपांडे पुन्हां मानवी स्वभावांतील चंचलतेचा विचार करत बाहेर आला आणि सारी कारकून मंडळी नेहमींच्या पद्धतीनेंच बावळटपणानें त्याच्याकडे बघावयास लागली. मग त्यांनीं दोन घंट्या वाजवून नायकूला आंत बोलावलं आणि चार-पांच लेटर्स डिक्टेट केले. त्याच्या कोटाच्या कापडाचीच त्यांनीं पृच्छा केली.

जांभई देऊन त्यांनीं आपलीं बोटें मोडलीं. काम जवळ जवळ संपत आलं होतं. शेवटच्या चार-दोन फाइल्सवर सह्या ठोकायच्या, हाताखालील लोकांना ऑर्डर्स द्यायच्या नि मग बाहेर पडायचं. क्लबला जायचं, तिथं थोडी मौज करायची. पत्ते खेळायचे, एक-दोन 'पेग' ढोसायचे नि मग रात्र पडल्यावर घरीं जायचं.

मोठ्या साहेबांचा चपराशी आंत आला, आणि साहेब बोलावत आहेत म्हणून सांगितलं. त्यांच्या कपाळावर आंठ्या उमटल्या. भुवया किंचित् वक्र झाल्या. ते मुकाट्यानें जागेहून उठले, आणि मोठ्या साहेबांच्याकडे गेले. साहेबांनीं त्यांच्याकडे बघितलं. चन्द्रकान्तराव किंचित् डळमळले, आईस्फ्रूट चोखत जसं लहान पोर बोबडं बोबडं बोलतं तसे साहेब बोलूं लागले:

'Ye see Mr. Chandrakant Rao! look into these papers, tomorrow I have to reply in a meeting'–

आणि मान वेळावून चन्द्रकान्तराव 'Yes sir!' म्हणाले. त्यांचा सारा रुबाब इथें नाहींसा झाला होता, आणि त्यांची ही लीन-दीन वृत्ति तिथें नुकत्याच आलेल्या लुळ्या हेडक्लर्कनें बघितली होती. तो मनांतल्या मनांत हंसत होता...

चन्द्रकान्तराव कागदाचा गठ्ठा घेऊन परत आपल्या चेंबरकडे आले. गंगारामने दार उघडलं आणि ते आंत शिरावयास लागले. पुन्हां त्यांची दृष्टि आपल्या नांवाच्या बोर्डाकडे गेली आणि त्यावरील 'Assistant Director' हीं अक्षरें त्यांना परत बोंचूं लागलीं.

ते पुन्हां विचारमग्न झाले. त्यांना अजून तीन वर्षांनीं पेन्शन मिळणार होती, आणि साध्या नोकरींतूनच नव्हे, तर व्यवहाराच्या सर्वच दृष्टींनीं ते पेन्शनमध्यें निघणार होते. कदाचित् अखिल विश्वावर आपली सत्ता गाजवणारा तो सर्वांत मोठा अधिकारीहि, या जगांतलं आपलं कार्य संपलं म्हणून आपणास निवृत्त करील, अशी त्यांना भीति वाटली. त्या वेळीं त्यांना कुठलीच किंमत उरणार नव्हती, कुणी त्यांची आज्ञा पालन करणार नव्हतं. साध्या Assistant Director च्या जागेहून निवृत्त होण्यांत कांहींच अर्थ नव्हता. त्यापूर्वी एकदां तरी डायरेक्टरची— मोठ्या साहेबाची पोस्ट आपणास मिळावी असं त्यांना वाटावयास लागलं आणि तें बव्हंशीं अशक्य होतं.

आणि या जाणीवेनें त्यांना एकदम निराश झाल्यासारखें वाटलें मग कल्पनेनेंच ते विचारांत बदल करावयास लागले. खणणण् घंटी वाजवून हेडक्लर्कला त्यांनी बोलावलं... त्याची रजा कॅन्सल करून टाकली... देशपांडेचं प्रोमोशन वाढवलं... लक्ष्मीराजशीं लग्न करण्याचा बेत रहित केला... कुठल्याच गोष्टींत त्यांना गोडी वाटेनाशी झाली. आतां त्यांना एकच ध्यास जडला होता— आपल्याला कांहींहि करून डायरेक्टर व्हायला पाहिजे.

खोलींतील घड्याळाची टिक् टिक् चालू होती. आणि सकाळसारखंच आतांहि त्यांचं डोकं गरगरावयास लागलं. भिंतीवरील चार्टस, नकाशे फिरत असल्याचा त्यांना भास झाला आणि या गरगरणाऱ्या वर्तुळा-

भोंवतीं आपला सारा भविष्यकाळ फिरत आहे याची त्यांना जाणीव झाली, सारीं दृश्यें अस्पष्ट आणि धूसर होत आहेत असें त्यांना वाटावयास लागलें. ते विमनस्कपणें जागचे उठले आणि मोटारींत बसले, मोटार क्लबकडे घेऊन चालण्याची ड्रायव्हरला त्यांनीं तिरसटपणेंच आज्ञा दिली. तिथें कांहीं जणुं चिरंतन सुखाचा ठेवाच होता...!



# ६. रात्रींचीं माणसें

जेव्हां वातावरणांतील प्रकाशावर काळोखाची पुटं हळुहळूं चढावयास लागतात, कोंदटणाऱ्या अंधःकाराला कृत्रिम दिवट्या टिचक्या मारावयास लागतात, सबंध उत्साहावर ग्लानि घोटाळावयास लागते आणि विश्वाचं प्रचंड चक्र अचानक स्थिरावून जातं, दिवसाच्या संस्कृतीचं तोंड बंद पडावयास लागतं, परिटघडीला चुरळ्या पडून जातात, सभ्यतेचे बुरखे उघडावयास लागतात, दबलेल्या वेदना उसळावयास सुरुवात होते, दिवसाच्या साम्राज्याचा अस्त होतो आणि पसरत जाणाऱ्या काळोखाच्या महासागरावर कित्येक जहाजें डोकें वर काढावयास लागतात, तिथें भरती आलेली असते...

तेव्हां रात्रींच्या हालचालींना प्रारंभ व्हायला लागतो. दिवसाभराच्या भेसूरतेला कवटाळून बसणाऱ्यांच्या मनावरील भीतीचं दडपण नाहींसं झालेलं असतं. सर्व बंधनें सैल होऊन जातात, घड्याळाचे काटे रात्रीवरून सरकत असतात आणि ह्याच वेळीं पुष्कळ जागीं सकाळ झालेली असते. प्रत्येक गांवांतील विशिष्ट जागीं रहदारी वाढायला लागते. उपाशीं पोटीं दिवस ढकललेले लोक अन्नाच्या शोधार्थ बाहेर पडतात. चंगीभंगी लोक वेश्येचीं घरें धुंडाळावयाला लागतात. दिवसाच्या पांढऱ्या वृत्तीवर गुलाबी छटा उमटावयाला लागते. 'बार्स' मध्यें बाटल्यांचीं बुचें फटाफट उडावयाला लागतात आणि शरिरांत उतू जाणारीं मस्ती अशाच कुठल्यातरी गल्लीबोळांत विरावयास लागते. झगमगीत प्रका-

शांतील एकमेकांची भीति ह्या वेळीं नाहींशी झालेली असते. जातिभेद, धर्माभिमान, राजकीय मतें आणि हेवेदावे हीं सारीं मावळणाऱ्या सूर्याबरोबरच लोपून जातात आणि ऐक्याचं औटघटकेचं राज्य सुरू होतं. ह्या राज्यांतील साऱ्याच उलाढाली क्षणैक असतात– सारे कारभार गडबडीनें उरकावे लागतात...

मी शांत चित्तानें घराबाहेर पडतों. विरळ अंधार प्रकाशांतून एकांत रस्त्याला तुडवावयास लागतों. एखाद दुसरं वाहन शांततेला तुरळकपणें तडा पाडत असतं. रस्त्यावरील विजेचे मोठमोठे गोळे ऐटींत तळपत असतात. दूरवर निर्जन रस्ता आणि दिव्यांची रांगच्या रांग पसरलेली असते. रस्त्याच्या आजुबाजूला कुत्रीं पसरलेली असतात आणि बाकी सारा काळोख असतो. आकाशाला पांढरीं छिद्रें पडलेलीं असतात. नितांत शांतता. दिवसाभराचा गोंगाट गुदमरून जातो आणि ह्या वेळची शांतता त्याचा जणुं सूड घेत आहे असं वाटायला लागतं. मी खिशांत हात घालून, सिगारेटचा धूर सोडत मंद गतीनं चालत असतों, डोक्यांत बंडखोर विचार उसळलेले असतात. दिवसाच्या प्रहरीं ज्या गोष्टी अशक्य वाटतात, त्या आतां शक्यतेंत समूर्त होतात. अपूर्ण मनोरथ, वाढणाऱ्या अंधःकारांत परिपूर्णतेचं समाधान द्यावयाला लागतात, आणि मी राजा बनलेला असतों. कुठून तरी एक मनुष्य अचानक समोर येतो. तो सरळ येऊन माझ्या शर्टची कॉलर पकडतो. त्याच्या हातांत चकाकणारा सुरा असतो. सभोंवतालच्या चारदोन फर्लांगांत एकहि दुसरा माणूस भेटण्याची शक्यता दिसत नाहीं. मी निर्विकारपणें माझा शर्ट पकडलेल्या माणसाला कुठलाहि विरोध न करतां उभा राहतों. भीतिमुळें तो स्वतःच भेदरलेला असतो, त्याचा श्वासोच्छ्वास जोरजोरानें चालावयास लागतो, मला त्याची मजा वाटते. माझा धिमेपणा त्याला असह्य होतो आणि तो मला दरडावतो. "तुझ्याजवळचे सारे पैसे मुकाट्यानें माझ्या स्वाधीन कर. कमीजास्त आरडाओरडा

करण्याचा प्रयत्न करशील तर हा सुरा आरपार निघेल– याद राख!"

"अरेच्चा! एवढ्या साध्या गोष्टीसाठीं इतके व्याप कशाला करतोस? मला सरळ कां नाहीं सांगितलंस पैसे हवेत म्हणून? त्याचं असं आहे मित्रा! सध्या किनई माझ्या खिशांत चार आणे आहेत आणि चहा पिण्याची माझी मनस्वी इच्छा आहे, तुझी जर तयारी असेल तर चल माझ्याबरोबर, आपण दोघेंहि झक्कैपैकीं चहा घेऊं या"–

तो एंव्हाना माझं मनगट चाचपतों. त्यावर घड्याळ असेल अशी त्याची समजूत असते. पण माझ्या मनगटावर घड्याळ नसतें, बोटांत अंगठ्या नसतात आणि खिशांत पैसेहि नसतात म्हणून मी निर्धास्त असतों. माझ्यासारखं 'गिऱ्हाईक' मिळाल्यामुळें माझ्या त्या मित्राची घोर निराशा झालेली असते. "तूंहि माझ्यासारखाच दिसतोस कुणी-तरी!" म्हणत तो आपली पकड ढिली करतो. सुरा आपल्या खिशांत ठेवून देतो. त्याचं हें माणुसकीचं वागणं बघून मी त्याच्या पाठीवर हळूच थाप मारत त्याला बोलावयास लागतों. "त्याचं असं आहे दोस्त! जगांत तूं एकटाच लुटारू नाहींस–सारींच लुटारू आहेत! ज्यांचं भाग्य चांगलं असतं त्यांना भरपूर पैसा मिळतो आणि तुला एक गोष्ट सांगूं? असं रात्रीच्या वेळीं चोरी करणं फारच वाईट आहे. दिवसाच्या प्रहरीं चोरी करतां येत नाहीं, असं वाटतं कां तुला? तूं मला केव्हांतरी दिवसा भेट म्हणजे तुला दाखवतो आपले सारे जातभाई."–

"तूं चांगलाच धीट आहेस कीं! माझ्या सुऱ्याचं तुला भय वाटत नाहीं?" तो विचारतो.

"मुळींच नाहीं! माणसाला मारणं, खरं म्हणजे कांहीं फारसं कठीण नाहीं. पण आपण सर्वजण ज्या जगांत वावरत आहोंत, तिथं अशीं कांहीं चमत्कारिक बंधनं आहेत, कीं, तीं सारी आपण आपल्या इच्छे-विरुद्ध पाळत असतों. एकमेकांवर मनांतून चिडण्यापलिकडे आपणांस कांहींहि करतां येत नाहीं. पुष्कळांना मारून टाकावंसं वाटतं, पण तसं

कुणीच करूं शकत नाहीं. आणि दुसरं कारण असं आहे दोस्त! कुणालाहि मारणं एकंदर वाईटच असतं, नाहीं कां? आपणांस ज्या गोष्टी हव्या असतात त्या मिळविण्यासाठीं इतर अनेक मार्ग अस्तित्वांत आहेत. आतां तुझीच गोष्ट घे. खरं सांग हं– तूं मला खरोखरीच मारणार होतास कां?"

"तुला फक्त मी भेडसावलं होतं; पण तुला हें कसं कळलं?" तो आश्चर्य प्रकट करतो.

"त्याचं असं आहे. आपल्या मनामध्यें एक राक्षस बसलेला असतो. तो थोडयाशा वेळांसाठीं मनांमध्यें असें कांहीं विचार उत्पन्न करतो कीं, त्यामुळें आपणांस एक थोडासा झटका येतो. पण लगेच त्या राक्षसाला कुणीतरी टपली मारतं आणि आपलें तें वाईट विचार कुठल्याकुठें पळून जातात. तुला अजून एक गोष्ट सांगूं कां? आपलं हें पोट आहे ना, तें फार वाईट आहे. तूं चोऱ्या तरी कां करतोस?"

माझ्या या प्रश्नाचं तो खालीं बघत उत्तर देतो, "पोटासाठींच मला चोरी करावी लागते. पण माझ्या एकट्याच्या नाहीं घरीं बायको आहे, दोन तीन पोरें आहेत, त्या सर्वांच्या साठीं मी चोरी करतो. किती दिवस बेकारींत काढावेंत? आणि खावं तरी काय?"

क्षणापूर्वी माझ्या पुढ्यांत सुरा घेऊन उभा राहिलेला चोर अगदींच लीन बनून जातो. त्याच्या जागीं माझ्यासारखाच एक सामान्य मनुष्य उभा राहिलेला असतो असंख्य दुःखें उराशीं बाळगणारा! दुःखाचें अश्रू बनून डोळ्यांत तरळावयास लागतात. कंठ सद्गदित बनतो, गुन्हा करायला सज्ज झालेलं मन लाजेच्या आवरणांत गुरफटून जातं, वेदनांचे चित्कार घुमावयास लागतात, आणि मन रडावयास लागतं. "तुझं नांव काय आहे?" माझ्या ह्या प्रश्नानें तो पुन्हां कावराबावरा होतो. मी पोलीसांत वर्दी देईन अशी त्याला भीति पडते; पण परत मी त्याला म्हणतो, "घाबरूं नकोस! विश्वास ठेव माझ्यावर. क्षुल्लक

कारणांसाठीं मी पोलीसांजवळ जात नसतों."

"माझं नांव बशीर आहे. मला माझ्या कृत्याबद्दल खरोखरंच फार वाईट वाटतं" तो म्हणतो.

"त्याचं असं आहे बशीर. माणूस हा उपजतच गुन्हेगार नाहीं. आजुबाजूचे लोकच त्याला पाप करण्यास प्रवृत्त करतात. प्रत्येकाला समानतेनें जगण्याची संधि आपल्यांतलेच कांहीं लोक मिळूं देत नाहींत आणि मग हळुहळूं माणूस पापाच्या मार्गाकडे झुकावयास लागतो; आणि थोडासा विचार केलास तर तुला स्वतःलाहि समजून येईल कीं, आपल्या एकंदर दुःखाला आणि परिस्थितीला अशा गोष्टी करून जास्त दिवस जगतां येणं शक्य नाहीं. त्यासाठीं इतर कांहीं तरी उपाय बघावेच लागतील. दारिद्र्य आणि उपासमार हें तुझं एकट्याचं दुःख नाहीं. आपल्यांतील अनेकजण असेच आहेत. सर्वांनीं एकत्र येऊन त्यांतून कांहीं-तरी मार्ग काढावयास पाहिजे."

"तुझं बोलणं मला समजत नाहीं; पण दुःख म्हणजे काय आहे हें तुला माहीत आहे असं दिसतं. जा तूं– मी मात्र परत असलं कांहीं करणार नाहीं, एवढं तुला आश्वासन देतों. तूं देवमाणूस आहेस!"

तो जसा अचानकपणें आलेला असतो, त्याचप्रमाणें मी कांहीं बोलण्याच्या आंत निघून जातो आणि त्याच्याविषयीं विचार करत मी परत चालण्यास सुरुवात करतों. त्याला पुष्कळसं सांगण्याची इच्छा असते; पण तोच संकोचामुळें माझ्या पुढ्यांतून चालता होतो. मला स्वतःजवळ भरपूर पैसे नसल्याचं वाईट वाटतं. मनापुढं सारखी त्याची आकृति घोटाळत असते. कल्पना त्याच्या संसाराचं चित्र रंगवावयास लागते. एक बाई आणि दोन तीन मुलें कुठेंतरी खोळांत असलेलं त्याचं घर. शांतपणें झोपलेलीं मुलं आणि काळजीनं अंथरुणाच्या लक्तरांत जागत बसलेली त्यांची आई. अनेक बरें वाईट विचार तिच्या मनांत उसळलेले असतील. नवरा भरपूर पैसे आणील– सकाळीं बाजार करतां येईल...

अनेक वस्तू विकत घेतां येतील... असल्या प्रकारचें आनंददायक विचार आणि त्यांच्याच जोडीला भयंकर भीति! नवऱ्याला कुणीतरी पकडलं असेल; पोलिसांत दिलं असेल; तुरुंग- शिक्षा- नवऱ्यानं जर कुणाचा खून केला असेल तर फांस! ह्या साऱ्या विचारांनीं ती कमालीची भेदरून गेलेली असेल. किंवा नवरा घराबाहेर पडतांच तिचेंहि अनेक धंदे सुरूं झाले असतील! दारिद्र्य माणसाला काय करायला लावीत नाहीं? ती जर थोडीशी सुन्दर असेल, तरुण असेल तर पोटाच्या खळगीसाठीं शरिराचा लिलांव करत असेल. सभ्य समाजाच्या अनीतीला गुप्तपणें स्वतःचा बळी देऊन कृतकृतार्थ होत असेल. ती मनांतून कुणावर तरी चिडलेली असेल आणि त्याच धुंदींत साऱ्यांवर सूड उगवत असेल...

कमालीचा निर्लज्जपणा!

या विचारांनीं मी किंचित्सा अस्वस्थ झालेला असतो. रस्त्यांतून झोकांडया देत जाणारी एखादीं स्वारी भेटते. जवळ आल्याबरोबर दारूचा आंबट वास येतो. त्याला टाळून पुढें निघून जावंसं वाटतं. एवढ्यांतच मला बघून तो जागच्या जागीं थबकलेला असतो. डोळे वटारून माझ्याकडे बघतो, माझे हात घट्ट धरतो आणि ते एकदम सोडून देऊन मोठमोठ्यानें हंसावयाला लागतो. मला त्याच्या ह्या गोष्टींचं मुळींच आश्चर्य वाटत नाहीं.

त्याची बडबड सुरूं होते. "तुला माहीत आहे मी कोण आहे? मी इथला राजा आहे. राजा! देवाशप्पत्. खोटं नाहीं सांगत. हे बघ खिशांत किती पैसे आहेत तें. पाहिजे असतील तर हें घे; पण थांब! तूं कोण आहेस? चोर तर नाहींस ना? तसं असेल तर तुरुंगांत जावं लागेल, माझा बाप तुरुंगांत गेला, आई एका माणसाबरोबर पळून गेली. माझ्याजवळ खूप पैसे आहेत. तूं देशील माझे आईबाप? तूं माझा बाप आहेस..." तो मोठमोठ्यानें रडावयास लागतो. त्याच्या या

असंबद्ध बोलण्यामागील दुःखांचा मी मनांशी विचार करत असतों. दारूडे कांहींतरी बडबडत असतात असा कित्येकांचा समज आहे– पण त्यांच्या बडबडीमागें कारुण्याचे पर्वत उभे राहिलेले असतात. दुःखाचे उमाळे दाबून टाकण्याचा ते प्रयत्न करत असतात, पण दुःख एवढ्या प्रकर्षानें त्यांच्या मनांत बिंबलेलं असतं कीं, कुठल्याहि परिस्थितींत बाहेर पडतंच. " माझं घर कुठं आहे? तूं मला सोडशील घरीं! मी तुला पैसे देईन; पण माझं घर मी आजच विकलं आहे– भरपूर पैसे मिळाले. दारू पितोस? ही पहा खिशांत बाटली–"

तो माझ्यासमोर स्वतःच ती खलास करतो. त्याच्या वेदना बघण्याचं माझं सामर्थ्य नाहींसं होतं. मी झटक्यासरशीं तिथून पुढें जावयास लागतो. त्याच्या लेखीं मी वेडा असतो आणि त्याच समाधानांत तो माझ्याकडे बघून परत मोठमोठ्यानें हंसतो आणि रडतोहि! त्याच्या या हंसण्यारडण्याचे आवाज प्रशांत वातावरणांत प्रतिध्वनित झालेले असतात. त्याची वेडसर आकृति प्रतिक्षणीं दृष्टीपुढें उभी राहावयास लागते आणि मग त्याच्याविषयींचे विचार मनांत खुपावयास लागतात.

तो एक दारूडा असतो. पुष्कळ माणसं दारू पितात, झिंगतात– आणि त्या कैफांत त्यांचा चिरंतन आनंद सांठविलेला असतो. अनेक माणसं चैनीसाठीं दारू पितात आणि कांहीं निष्कारण पितात. आपली सहज प्यावीशीं वाटते म्हणून! मला भेटलेला माणूस खरोखरीच दुःखी असावा. आईबापाविना तुडवत तुडवत त्यानं जीवनाचा बराचसा भाग कंठला होता. त्याला पदोपदीं अडथळे निर्माण झाले असतील. त्याचा बाप कुठल्यातरी गुन्ह्यासाठीं तुरुंगांत गेला होता, आई व्यभिचारी होती. आणि त्यांच्या एकंदर अपराधाचं खापर ह्या माणसाच्या माथ्यावर फोडलं गेलं असेल, आणि एवढं प्रचंड दुःख उराशीं बाळगून संयपर्णे जीवन जगावयास तो कांहीं असामान्य माणूस नव्हता. वृत्तींतील साऱ्या विकृति जागृत झाल्या असतील आणि तो क्रमाक्रमानें या

पायरीपर्यंत पोहोंचला असेल. त्याच्या आईबापाच्या पापांचं खापर ह्याच्या माथ्यावर कां फोडण्यांत यावं? आणि त्यांनीं तरी गुन्हे कां केले असतील?...

माझ्या विचारांच्या लाटा पुढें पुढेंच जात होत्या आणि त्या कुठल्याच विशिष्ट स्थळीं जावून स्थिरावणार नव्हत्या. पुढून एक रिक्षा मंद गतीनें येत होता. सुस्त बनलेला तरुण रिक्षावाला आपल्या भसाडया आवाजांत कुठलं तरी फिल्मी गाणं घोळीत होता. त्याच्या ह्या संगीत साधनेला आतां कुणीच आळा घालूं शकत नव्हतं. भर दिवसा त्याच्या या रेकण्याला सर्वांनीं आळा घातला असता, त्याचा गळा दाबला असता, पण ह्या वेळीं तो स्वतंत्र होता. गाण्यांतील अर्थाशीं आणि सुरांशी त्याचं कांहींच कर्तव्य नव्हतं–मनाला रिझविण्यासाठीं तो ओरडत होता. पण त्याचा हा सहजगत चाळाहि अर्थहीन नव्हता. नकळत त्याच्या मनांतील मळमळ शब्द रूपानें बाहेर पडत होती. आणि त्याला ह्याची जाणीवहि नव्हती. तो आपला गात होता. 'भगवान दो घडी जरा इन्सान बनके देख–' केवढं जबरदस्त आव्हान होतं तें! पृथ्वीतलावरील दुःखांची परमावधि झाली होती आणि ती बघण्यास खरोखरच साक्षात् परमेश्वराची त्याला आवश्यकता भासत होती! जणुं माणसांना माणसांचं दुःख समजण्यासारखं राहिलं नव्हतं! मी लक्ष देऊन त्याच्या गाण्याचा विचार करत उभा राहिलों. त्याचं पोट जागं झालं "किधर जायेंगे साब?"

"मला कुठेंच जायचं नाहीं बाबा! आणि जिथं जावसं वाटतं तिथं मला तुझ्या या रिक्षांतून जातांहि येणार नाहीं– मी सहज तुझं गाणं ऐकत उभा राहिलों होतो"–

"क्युं गरीबका मजाक करते हैं साब?" तो किंचित् ओशाळून म्हणाला. त्याला असं वाटत होतं कीं, मी त्याची चेष्टा करतोय; पण त्याला ह्याची जाणीव नव्हती कीं तो केवढा मोठा प्रश्न एका अज्ञात

शक्तीला विचारण्याचं धाडस करत आहे तें? तो दिसावयाला तरूण होता, अंगापिंडानेंहि सुदृढ होता. त्याला व्यवस्थेशीर खाण्यापिण्याला मिळालं असतं, शरिराभोंवतीं गुंडाळण्यास चांगले कपडे मिळालें असतें, तर त्याला, कुठल्याहि कादंबरीचा नायक होता आलं असतं! पण आज त्याला गुरासारखे कष्ट करावे लागत होते. तो रात्रंदिवस खपत होता. चार सहा आणेहि त्याच्या लेखी केवढी तरी मोठी धनदौलत होती. पण ह्या एवढ्याशा पैशासाठीं तो कितीतरी मोठं मोल देत होता. चार सहा वर्षांत ह्याच्या शरिरांतील साऱ्या मानवी संवेदना मरगाळून जातील. शरीराला श्रम सोसणार नाहींत आणि हातपाय खोरत जगण्याच्या धडपडीला सोडावं लागेल. त्याचा बळी घेतला जाईल, आणि त्यावेळींहि त्याच्या सुप्त मनांत ह्याच ओळीं निनादत असतील. "भगवान दो घडी जरा इन्सान बनके देख–" आणि त्याच्या या आव्हानाला काळ उपहासानें हंसेल. एक मानवी जीव अशा प्रकारचं धाडस करतो काय? या जगांत कुठलीहि गोष्ट आपल्या स्वाधीन नाहीं. एवढी साधी जाणीव नसावी?...

विचारांच्या तंद्रींत मी कुठेंतरी पोहोंचतो, आणि एकाएकीं बऱ्याचशा आवाजांनी भानावर येतो. माझी मलाच लाज वाटते! चुकून देखील माझ्यासारखा माणूस ज्या विभागांत येणार नाहीं अशा जागीं मी सहजगत्या आलेला असतों. माणसांच्या बजबजपुरींत! समाज ज्या विभागाचा तुच्छतेनें उल्लेख करतो तोच विभाग– कृत्रिम प्रकाशानें तो झगमगलेला असतो. माडया माडयांतून संगीत बाहेर पडत असतं आणि त्यांचं चमत्कारिक मिश्रण कानांना कसंसंच वाटतं. चेहेरें रंगवलेल्या बायका गॅलेरी गॅलेरींत रस्ता न्याहाळत उभ्या असतात. पौरुषाला त्यांचा तो श्रृंगार आमंत्रण करीत असतो. दिवसाच्या प्रहरीं ज्या गोष्टींची कमालीची किळस येईल त्या साऱ्या गोष्टी ह्यावेळीं घृणेच्या पलीकडे गेलेल्या असतात. प्रमत्त कामवासना भक्ष्याच्या शोधार्थ घुट-

मळत असतें आणि रात्रींची जादू अशी कांहीं विलक्षण असते कीं, त्यावेळीं जाणीवा अंध बनलेला असतात. तिथं लाज नसते, नीति-अनीति नसतें, स्वप्नाळू प्रेम नसतं आणि कुठलंच सुखदुःखहि नसतं. फक्त व्यापार. आणि गंमत अशीं असते कीं, ह्याच गोष्टींची पुनरावृत्ति दिवसाच्या प्रहरींहि चाललेली असते. फक्त तिला गोंडस नांव देण्यांत आलेलं असतं एवढंच!

कावरंबावरं होऊन इकडे तिकडे बघतांच एखादी गॅलेरी सहजगत ओरडतें "आव नां बाबूजी—" आणि मन केवढ्यांदा तरी दचकतं. हे शब्द कानाला भयंकर चमत्कारिक वाटावयाला लागतात. स्थळकाळाच्या बदलांत साध्याहि गोष्टींना केवढं तरी भेसूर स्वरुप प्राप्त झालेलं असतं. मोहक, प्रेमळ आणि गोंडस शब्द ऐकण्याची कानांना संवय जडलेली असते आणि मनहि भलतंच दुबळं असतं! ज्या गोष्टीकडे भावनेच्या काचांतून आजपर्यंत बघितलेलं असतं, ती गोष्ट उघडी नागडी बघवत नाहीं. त्या स्त्रीला यांत कुठलंच नाविन्य नसेल. इथं असलेच भयंकर आणि निर्लज्ज वाटणारे शब्द घोटून गुळगुळीत झाले असतील. पण मला मात्र दरदरून घाम आलेला असतो. अनैतिक बनण्यासाठींहि केवढ्या-तरी मोठ्या धैर्याची आवश्कता आहे याची खात्री पटते आणि मी ताबडतोब दिशा बदलून चालावयास लागतो.



— जेव्हां वातावरणांतील प्रकाशावर काळोखाची पुटें हळुहळू चढा-वयास लागतात, कोंदटणाऱ्या अंधःकाराला कृत्रिम दिवटया टिचक्या मारीत असतात, सबंध उत्साहावर ग्लानि घोटाळावयास लागतें, विश्वाचं प्रचंड चक्र अचानकच स्थिरावून जातं...दिवसाच्या संस्कृतीचं तोंड बंद पडावयास लागतं. परिटघडीला चुरळ्या पडून जातात, सभ्य-

तेचें बुरखे उघडावयास लागतात, दबलेल्या वेदना उसळून येतात. दिवसाच्या साम्राज्याचा अस्त होतो आणि कित्येक जहाजें काळोखाच्या महासागरावर डोकें वर काढावयास लागतात–तिथें भरती आलेली असते......

...आणि त्याच वेळीं मी काळोखांत भरकटत असतो. दिवसाच्या प्रहरीं सारी माणसें कळसूत्री बाहुल्यासारखीं वाटत असतात. कुठली तरी अज्ञात शक्ति कळ फिरवत असते आणि त्यानुसार साऱ्यांची हालचाल होत असते. शाळा–कॉलेजं, ऑफिस, हॉटेलस्, रस्ता आणि घरं देखील एकसारखी फिरत असतात. अनेक बंधनें पाळून विशाल सृष्टि ठराविक क्रमानें सारखी गरगरत असते. आसमंतांत आवाजाचें लोळच्या लोळ विरत असतात, आणि साऱ्या जगाची शक्ति क्षीण क्षीण होत जाते. आनंद, दुःख, प्रेम, ध्येय वगैरे अनेक गोष्टींचा मनावर ताबा असतो आणि हें सारे शब्द किती गुळगुळीत आहेत याची कुणालाच जाणीव मात्र होत नाहीं. यांच्या भोंवतीं अंधपणें जीवनाचं जाळं गुंफित जाण्याची संवय आपोआप निर्माण झालेली असते. पुष्कळसा आरडाओरडा चाललेला असतो–आणि दिपविणाऱ्या प्रकाशांत साऱ्याच गोष्टीं धूसर बनलेल्या असतात. मनांत श्रद्धा बाळगली जाते आणि तरीहि ती दृढ झालेली नसते. जीवनाच्या एकाच अंगाचा विचार केलेला असतो. त्याची भयंकर भासणारी पण वस्तुतः प्रामाणिकच असणारी बाजू काळोखांत असते, रात्रीच्या काळोखांत ! ...

मला लुटावयास आलेला चोर, वेडसर दारुडा; उत्साही रिक्षावाला आणि निर्लज्ज वेश्या–अशीं अनेक दिवसां दडलेलीं माणसें अगदीं जवळून बघावयास मिळतात, तिथं कुठलाच आडपडदा राहिलेला नसतो. सारे व्यवहार अगदीं रोखठोख आणि प्रामाणिकपणें चाललेलें असतात. आणि त्यांची ही रात्रीची धडपड दिवसासाठींच चाललेली असते–दिवसाच्या दुःखांतून त्यांच्या या रात्रीच्या पापांना जन्म मिळा-

लेला असतो. या गोष्टींचा त्यांना निश्चितच दिवसा पश्चाताप होत असेल आणि क्षुद्रतेची लाजहि वाटत असेल–आणि कदाचित् त्यांच्या इच्छेविरुद्ध या साऱ्या गोष्टी होत असाव्यात......

चोराला रात्रीचं क्षणिक सुख दिवसा बोंचत असेल. तो असलं पाप पुन्हां करणार नाहीं. अशीं आपल्या पत्नीजवळ कबूली देत असेल... पोटाची खळगी भरण्यासाठीं रात्रीं शरीराचा विक्रय करणारी त्याची पत्नीहि दिवसा पतिव्रता बनण्याचा निर्धार करत असेल...तीं दोघेंहि एकमेकांचे अपराध दृष्टि आड करत असतील...

वेडसर भासणारा दारुडा सकाळीं जेव्हां धुंदींतून जागा होईल, तेव्हां त्याला रात्रीची कुठलीच आठवण राहणार नाहीं...तुरुंगांत खडी फोडणाऱ्या आपल्या बापालाहि तो विसरेल आणि व्यभिचारी आईचा त्याला तिरस्कार वाटून तो तिची साधी आठवणहि बाळगणार नाहीं. घर विकून मिळालेल्या पैशावर कसंतरी करून पुष्कळ दिवस जगण्याचा तो बेत करत असेल...आणि परत दारुला स्पर्श करणार नाहीं असंहि ठरवीत असेल...तो कुठल्यातरी कामांत आपलं चित्त गुंगवील, आणि प्रामाणिक बनण्याची धडपड करील...

रिक्षावाला आपल्या पदरांत पडलेल्या प्राप्तीकडे बघून निराश होईल, आपलें वांया जाणारें जोडीदार बघेल आणि कुठलं तरी दुसरं काम बघून आयुष्य घालवावं, या विचारांत गुरफटून जाईल. आपलं तारुण्य एवढं स्वस्त जाऊं देण्यांत कांहींच अर्थ नाहीं, असें विचार त्याच्या मनांत येत असतील आणि तरीहि प्राप्त परिस्थितीविरुद्ध कशा प्रकारें झगडावं याची त्याला कांहींच कल्पना करतां येत नसेल...आणि तो याच प्रश्नाभोंवती दिवसाहि फिरत असेल...

रात्रीं कुण्याहि पुरुषाला जाहीर आव्हान करणारी वेश्या दिवसा भयंकर कुरूप दिसत असेल...तिची रंगरंगोटी विस्कटून गेलेली असेल आणि मरगाळून गेलेल्या शरीराचा तिला स्वतःलाच मनस्वी तिटकारा

येऊन हा व्यवसाय सोडून द्यायचे विचार तिच्या मनांत येत असतील... चांगलें जीवन जगण्याची वेडी आशा तीहि सदोदित आपल्या मनांत बाळगत असेल...

मनावर विलक्षण थकवा पसरत होता आणि पाय पेंगुळावयास लागल्यामुळें मला घरीं परतणें भाग होतें...रात्रीची गुंगी मनावर पसरत होती आणि डोळे झोपेनें जड झालें होते. भेटलेल्या माणसांचें उलट सुलट विचार मनांत गर्दी करत होते–आणि आकाशाकडे बघत मी रस्ता तुडवीत होतो.

एक भिकारी दीन आवाजांत ओरडून एवढ्या रात्रींहि भीक मागत होता. खिशांतील सारे सुटे पैसे त्याच्या कटोऱ्यांत मी टाकून दिलें–आणि विषादाची एक झिणझिणी साऱ्या शरीरभर दवडून लुप्त झाली...

मनावर अज्ञात घाव बसत होतें!



## ७. वर्तुळ

काळाच्या विशाल पोटावर घड्याळानें पांच गुद्दे लगावतांच, तो किंचितसा थबकून हंसला, आणि त्या हास्याची प्रतिक्रिया साऱ्या सेक्रेटरीएटभर उमटली– टाईपरायटरचें संगीत बंद पडलें. बाहेरच्या बागेंत संध्याकाळचें संत्रें कुणी तरी उकलावयास लागलें– तें चाखण्यासाठीं सर्व लोक धांदल करावयास लागले. सेक्रेटरीएटमधील टेबलखुर्च्या हळुहळूं रिकाम्या व्हावयास लागल्या घरीं जाण्याच्या उत्साहाच्या भरांत, त्यांची रचना वेडीवांकडी करून टाकण्यांत आली होती– ट्रे मधील लेखण्यांची उद्‌गारवाचक चिन्हें बनलीं होतीं, आणि सबंध दिवसभर टोपलींत फेंकून दिलेले कागद खुसुखुसु हंसावयास लागले होते...

'काय भाऊराव– येणार ना? आठ नंबरची बस पकडतां येईल आपल्याला'– शेजारच्या कारकुनानें भाऊरावांना प्रश्न केला– आणि मग भाऊराव भानावर आले.

'अहो! ते काय येतात एवढ्यांतच? आतां तर त्यांच्या कामाला सुरुवात होते– काय भाऊराव, खरें कां नाहीं?' परवांच अपॉइंट झालेल्या एका तरण्या कारकुनानें हंसत हंसत म्हटलें. आपण फार मार्मिक विनोद केला असें त्याला वाटलें.

'तुम्ही व्हा पुढें– मी येतों आपला मागून'– भाऊरावांनीं त्यांना वाटेला लावलें– पांढऱ्या शुभ्र शांततेची चादर सेक्रेटरीएटच्या भव्य इमारतीवर पसरल्यासारखी वाटली. भिंतीवरील घड्याळ टक् टक् करत

होतें– भाऊरावांचे लक्ष सहजच तिकडे गेलें– घड्याळाचा लंबक एखाद्या मोठ्या प्रश्नचिन्हासारखा त्यांना वाटला– जीवनविषयक अनेक गिचमिड प्रश्न त्यांच्या दृष्टीपुढें यावयास लागले आणि तो लंबक म्हणजे या साऱ्या प्रश्नांभोंवतींचें चिन्ह असल्यासारखे त्यांना वाटलें...

थोड्याच वेळांपूर्वी शेंकडो माणसें तिथें होतीं– एकमेकांशीं बोलत होतीं– अधिकार गाजवीत होतीं, हेवेदावे करीत होतीं– भांडत होतीं आणि प्रेमहि करीत होतीं– आणि नंतर तीं सारीं निघून गेलीं, वेगवेगळया दिशांनी– कुणी आठ नंबर– कुणी सात नंबर– कुणी लोकलनें– वरिष्ठ मंडळी आपापल्या कार्समधून... संकोचांतून विस्ताराकडे. त्या विस्तारांत प्रत्येकजण स्वतंत्र होता, एकटा होता. रस्त्यावर साहेब– साहेब नव्हता– कारकून, कारकून नव्हता– सारे एकाच रस्त्यावरचे प्रवासी होते– एकाच गोष्टीसाठीं धडपडणारे होते... जगण्याची धडपड– Struggle for existence–

हा विचार मनांत घोळवीत– भाऊरावहि विस्ताराच्या महासागरांत वाहावयास लागले. ते रस्त्यानें हळुहळूं निघाले. एका ठिकाणीं सडक दुरुस्त करण्याचें काम चाललें होतें– अर्धीअधिक उकरलेली सडक भकासपणें आपल्या लाचारीचं प्रदर्शन करीत होती, आणि सिमेंट नि रेती मिश्रण करण्याच्या यंत्राचा खडखडाट चालला होता. त्या यंत्राच्या मुखांत, गिट्टी, रेती, सिमेंट, पाणी अशा प्रकारच्या निरनिराळया वस्तु कोंबण्यांत येत होत्या, आणि तें मात्र या साऱ्यांना एकत्रित करीत होतें त्या यंत्राची खडखड आणि जीवनाची धडपड यांत त्यांना मग साम्य असल्याप्रमाणें वाटलें... सकाळीं भाऊराव ऑफिसला निघाले तेव्हांहि तें तिथेंच होते– अव्याहतपणें त्याचें कार्य चाललें होते... अखंड धडपड– रस्त्यावरील विजेचे खांब उद्‌गारवाचक चिन्हांप्रमाणें त्या यंत्राकडे बघत होते. एक लूत लागलेलं कुत्रं निवांतपणें फूटपाथलगत घोरत पडलं होतं. त्याकडे कुणाचंच लक्ष नव्हतं. पण भाऊराव

दृष्टीच्या टप्प्यांतील सारीं दृश्यें, न्याहाळीत होते. गुलगुल बोलत जाणाऱ्या मुलींचा एक घोळका त्यांच्या अंगावरून गेला होता, कडक परीटघडीचे कपडे वापरणाऱ्या एका माणसानें निष्कारणच त्यांच्याकडे तुच्छतेनें बघितलें, परवांच लग्न झालेल्या एका जोडप्यानं ऐटीचा दृष्टिक्षेप त्यांच्या अंगावर टाकला. खोकत जाणाऱ्या म्हाताऱ्यानें, त्यांना धक्का मारला, आणि भाऊराव मात्र निमूटपणें या सर्व गोष्टी बघत होते. प्रारंभीं त्यांना या विविधतेची मौज वाटत होती– पण हल्लीं ते गंभीरपणें या गोष्टींचा विचार करावयास लागले होते– या सर्व गोष्टी त्यांना जगाच्या प्रचंड यंत्राचे सुटे भाग असल्याप्रमाणें वाटत होत्या... सिमेंट नि रेती एकत्र करण्याचं यंत्र आणि पुनः पुन्हां दुरुस्त केली जाणारी सडक- परीटघडीच्या तोऱ्यांत जाणारा माणूस आणि धक्का मारणारा म्हातारा– गुलगुल बोलत जाणाऱ्या पोरी आणि लूत लागलेलं कुत्रं... या साऱ्या परस्पर विरोधी गोष्टी कमालीच्या विलग वाटत होत्या, आणि परत त्या एकसूत्र होत्या. मानलं तर एक गूढ आहे, नाहीं तर कांहींच नाहीं. विचार केला तर मेंदूच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडतात आणि न केला तर कुठलं तरी अदृश्य दडपण बुद्धीवर ठेवल्याचा भास होतो. अत्यंत विचित्र स्थिति...

आणि मग भाऊरावांना जाणीव झाली कीं या गोष्टी आपल्याला मुळींच अपरिचित नाहींत. त्यांत कांहींच आश्चर्यकारक नाहीं. या पर- स्पर संलग्न आहेत. जीवनाशीं निगडित आहेत. एका कुठल्या तरी अज्ञात शक्तीचे हे सारे अविभाज्य घटक आहेत...

समोरून येणाऱ्या एका माणसाचा पाय खळग्यांत पडला– मुरग- ळला, आणि त्याला असह्य वेदना झाल्या– लोक आपल्याकडे बघून हंसत आहेत का म्हणून त्यानं सभोंवार बघितलं– आणि कुणाला न समजेल अशा बेतांत तो लंगडत लंगडत चालावयास लागला. भाऊ- रावांनीं हें बघितलें. त्याचा पाय मुरगळतांच ज्या वेदनांनीं तो स्वतःशींच

किंचाळला होता, त्या वेदना इतर कुणालाच जाणवल्या नव्हत्या. कुणाचं त्याच्याकडे लक्षहि नव्हतं. भाऊरावांना क्षणैक वाटलं कीं आपला स्वतःचाच पाय मुरगळला आहे, असं त्या गृहस्थाला सांगावं, त्याच्या दुःखांत सहभागी व्हावं– पण त्यांनीं यापैकीं कांहींच केलं नाहीं, आणि मग त्यांचं त्यांनाच आश्चर्य वाटलं! सृष्टींतील प्रत्येक वस्तु जर परस्पर निगडित आहे तर एकास होणारा त्रास दुसऱ्याला कां जाणवत नाहीं– एकाच्या व्यथांनीं दुसरा कां हळहळत नाहीं? ...त्यांच्या बुद्धीच्या एका कप्यांत हा प्रश्न हळुहळूं शिजावयास लागला, आणि जगाकडे कुतूहलानें बघणारी त्यांची दृष्टि अजून एका गोष्टीचा विचार करावयास लागली. ज्या माणसाचा पाय मुरगळला होता, तो मनुष्य जगापासून आपलं दुःख लपवीत होता. वेदना होतांच तो मोठ्यानें विव्हळला नव्हता, तर आपलं लंगडण्याचं व्यंग इतरांना कळूं न देण्याची खबरदारी घेत होता. ही लपवाछपवी स्वतःची फसवणूक– तो कां करत होता? जीवनाच्या अंगप्रत्यंगांत या फसवाफसवीच्या गोष्टी कां सामावलेल्या आहेत?...

चौकावर दिशा दाखवणारा पोलीस त्यांनीं बघितला– तो शिट्या फुंकीत होता आणि हातवारे करीत विशिष्ट पद्धतीनें वाहनांना रस्ता देत होता. विखुरलेले लोक त्या स्थळाजवळ कांहीं क्षणासाठीं कां होईना, एकमेकांची दखल घेतल्यासारखे दाखवीत होते. भाऊरावांच्या मनानें प्रश्न केला, 'हा पोलीस इथें नसता तर?'

शद्ब निनादून उठले. "बन्धनें! बन्धनें!" आणि भाऊरावांच्या नजरेपुढें वेडीवांकडीं चित्रें उभीं राहूं लागलीं. पोलीसानें पुढें केलेला 'Stop' चा बोर्ड हळुहळूं पुढेंपुढें सरकावयास लागला– माणसांना मागें मागें ढकलावयास लागला– त्याच्या तोंडांतील शिट्टीला बांधलेला दोर लांबावयास लागला आणि साऱ्या माणसांना वेष्टून, करकच्चून बांधावयास लागला. त्या शक्तीपुढें सारीं माणसें लीन झालीं होतीं.

कुणांतच प्रतिकाराचं सामर्थ्य नव्हतं...भाऊरावांना वाटलं, आपण मात्र या लोकांपासून वेगळें आहोंत... आपल्याला कांहीं बन्धनें नाहींत. या विचारानें ते थोडेसे आनंदित झाले– पण एवढ्यांतच तें लूत लागलेलं कुत्रं त्यांच्या पायाजवळ येऊन केवढ्यानं तरी गुरगुरलं, तसे मग भाऊराव केवढ्यानें तरी दचकले...

त्यांनीं आपले डोळे हाताच्या तळव्यानें चोळले, मनावरचीं कोळीष्टकें झटकून टाकलीं, आणि परत नव्या उत्साहानें मार्ग आक्रमूं लागले. मघाच्या साऱ्या गोष्टी विसरण्याचा त्यांनीं निश्चय केला. ते तोंडांतल्या तोंडांत कांहीं तरी पुटपुटत होते. अधूनमधून हातवारे करीत होते, स्वतःशींच हंसत होते, एवढ्यांतच त्यांनीं एक प्रकार बघितला. भरधांव येणारी मोटार एका माणसाच्या अंगावर आदळली, आणि कांहीं आरडाओरडा करण्याच्या आंत त्यानं आपला कारभार आटोपला. रक्ताच्या चिळकांड्या त्याच्या अंगांतून उडाल्या होत्या, आणि डोळे आंत जाऊन पांढरेशुभ्र झाले होते. लोकांचा घोळका त्यांच्या भोंवती घोंघावत होता, जणुं सारें जण मृत्युचं जवळून दर्शन घेत होते. कांहीं जणांचे ओंठ चुचकारत होते, आणि म्हातारी माणसें "परमेश्वराची इच्छा!" म्हणत निःश्वास सोडीत होतीं. लहान मुलांना कुतूहल वाटत होतें... या साऱ्या धांदलींत एक प्राणी मात्र निर्विकार दिसत होता– तोच मघाचा पोलीस! तो अपघाताचा रिपोर्ट लिहिण्यासाठीं आला होता– ॲम्ब्यूलन्स बोलावण्याची घाई करीत होता– जमलेल्या गर्दीला बाजूस सारीत होता– मेलेल्या माणसाला खालीवर करून बघत होता, नाना भानगडी चालल्या होत्या. भाऊरावांना विंचू चावल्याचा भास झाला. शरीराच्या आंत जोरजोरानें कांहीं तरी पळत आहे असें त्यांना वाटावयास लागलें. ते भयचकित झाले. माणूस मेला म्हणून नव्हे, तो त्यांचा कुणीच नव्हता. तो तरुण होता कां म्हातारा होता, सभ्य होता कां चोर होता, कांहीं कांहीं त्यांनी बघितलं नव्हतं. पण कांहीं तरी

जाणवत होतं... कांहीं तरी बोचत होतं...

मनांत अगम्य आवाज उठत होते. अन् मग हळुहळूं त्यांचे शब्द बनायास लागले. शब्दांना मूर्त स्वरूप येऊं लागलं. आजुबाजूंचीं माणसें म्हणजे फक्त त्या अज्ञात शब्दांच्या स्पष्ट आकृति आहेत, असं वाटायास लागलं. एक प्रदीर्घ ध्वनि – त्याचे तुटून तुटून बनलेले शब्द – आणि त्या शब्दाभोंवतीं गरगरत फिरणारीं सारीं माणसें. आनंद नांवाचा एक शब्द आणि त्याला वेष्टिणारा मघाचा मुलींचा घोळका – मेलेला उत्साह एक दुसरा शब्द आणि त्याला कवटाळून बसलेला खोकत जाणारा म्हातारा – घुटमळणाऱ्या आशा, आणि त्यांचं साकार स्वरूप म्हणजे तें लूत लागलेलं कुत्रं– आनिर्बंध जीवन आणि त्यांत बन्धनें घालणारा पोलीस – या सर्वांकडे नुसते सुन्न होऊन बघत राहणारे भाऊराव.

भाऊराव नांवाचे शब्द, सभोंवतालच्या शब्दाकडे बघत होते आणि बस्स! तेवढाच त्यांचा या सर्वांशीं संबंध होता. मग एकाएकीच त्यांना उबग आल्यासारखें वाटलें, अंगावर पाल पडल्याप्रमाणें वाटलें. शब्दांचा शब्दांशीं संबंध नव्हता, माणसांचा माणसांशीं संबंध नव्हता. एक मोठा वृक्ष– प्रत्येक भाग निराळा असलेला. फांद्यांचा पानांशीं संबंध नाहीं – पानांचा फुलांशीं नाहीं– फुलांचा फळांशीं नाहीं– फळांचा पांखरांशीं नाहीं अन् पांखरांचा जीवनाशीं नाहीं – आणि जीवनाचा कशाशींच नाहीं – अगदीं मृत्यूशीं देखील! प्रत्येक वस्तुजात स्वतंत्र...स्वैर...

हेंच जगण्याचं इंगित आहे–जिवंतपणाचं लक्षण आहे, सृष्टीचं तत्त्व आहे. भाऊरावांनीं या विचारासरशी चुटकी वाजविली. परत स्वतःशींच कांहीं हातवारे केले – शब्दाची सुप्त हालचाल ओंठावर तरळली, आणि मिशींत हास्य फुललें...मग तिथं कुठलाच विचार राहिला नाहीं. जीवनाचा राहिला नाहीं, मृत्यूचा राहिला नाहीं. सारे अगदीं शून्य शून्य झाल्याप्रमाणें वाटलें...

इतक्यांतच बाजूला एक गाय जोरांत हंबरली – लोकांनीं तिकडे बघितल्या न बघितल्यासारखें केलें. एका गुराचा स्वाभाविक आवाज पण भाऊरावांना असं वाटलं कीं तो निरर्थक नाहीं. त्यांत कांहीं तरी अर्थ आहे. हृदयाचं आक्रंदन आहे, कां मायेचा ओलावा आहे? एक सहज चाळा आहे, कां तो आवाजच नाहीं, तर केवळ एक भास आहे? आणि हा जर भास असेल – प्रेमाचा, वात्सल्याचा, हर्षाचा नि शोकाचा आभास असेल – तर? तर मग वस्तुमात्राला पडलेलं कोडं तावडतोब उलगडलं असतं. भाऊरावहि हाच विचार मनांत घोळवीत होते. या प्रश्नाचं समाधानकारक उत्तर आपल्यापाशीं आहे, या ऐटींत दंग होते. कुणी येऊन त्यांना विचारलं असतं तर ते अगदीं सहजगत्या सांगणार होते – हंबरणं हा एक अर्थशून्य आवाज आहे – आणि या आवाजामुळें गाय या शद्बाला महत्त्व प्राप्त झालेलं आहे – आवाज नसेल तर गाय राहणार नाहीं – पण – पण –

एक वासरूं कुठून तरी धांवत आलें, नि गायीच्या कुशींत शिरलें. गाय त्याच्या अंगास चाटावयास लागली नि तें शेपटी वर करावयास लागलें. या दृश्याकडेहि कुणी लक्ष दिलें नाहीं – परंतु भाऊराव मात्र एकाएकीच चपापले. त्यांच्या मनाची कांच एकदम खळकन् फुटली, आणि तुकडे खोलवर रुतावयास लागले. गायीचं हंबरणं निरर्थक नव्हतं. त्यामागें निश्चित एक भावना होती. तो एक शून्य आवाज नव्हता – त्या आवाजाला दिशा होती. त्या आवाजांत सामर्थ्य होतं. तो आवाज कुणाला तरी ओळखायला आला कुठें तरी त्याचे प्रतिसाद उमटले. आवाज – शद्ब – प्रतिसाद!

भाऊरावांचे पूर्वीचे विचार भिरभिरत गेले. गायीच्या वेडया वांकडया ओरडण्यांत एक अर्थ लपला होता – तो फक्त तिच्या वासरालाच कळत होता. म्हणजे सृष्टींतील कुठलीहि गोष्ट अर्थहीन नव्हती तर? तरीहि पण जे प्रत्यय येत होते ते निराळेच होते. पाहिजे तर असं

म्हणावं कीं पशूंना भावना असतात आणि माणसांना नसतात. पशू आणि माणसें ! भाऊरावांचे डोळे विस्फारले. आपण काय भलतीच तुलना करीत आहोंत – असा त्यांना विचार पडला. पण गूढांत शिरण्याचा त्यांनीं मुळीं निश्चयच केला होता. आतां मागें सरून उपयोग नव्हता. ते आता कुठल्याहि गोष्टीची तुलना कुठल्याहि गोष्टीबरोबर करणार होते. त्यांतून त्यांना एक सुसंगति हवी होती...

त्यांना एक जबरदस्त प्रश्न पडला होता. तो त्यांना भेडसावत होता. आंतून टोंचण्या मारीत होता, अस्वस्थ करीत होता, म्हणूनच तर ते एवढ्या कुतूहलानें जगाकडे बघत होते. जगाची विविध रूपें बघून आश्चर्य झाल्याप्रमाणें दर्शवीत होते, आणि पुन्हां कांहींहि घडलं नाहीं असाहि आविर्भाव आणीत होते. त्यांना जीवनाचं दर्शन घ्यायचं होतं म्हणून मृत्यूचं वाईट वाटत नव्हतं. दुःख अनुभवायचं होतं. म्हणून आनंद जाणवत नव्हता. प्रत्येक वस्तूकडे बघण्याची त्यांची तयारी होती. गायीच्या ओरडण्यानं वासरूं धांवून येत होतं, परंतु माणसाची हांक माणसाला ऐकूं येत नव्हती... स्वतःला जगविण्यासाठीं इतरांचे पाय ओढले जातात... थोडासा अधिकार मिळतांच दुसऱ्यावर सत्ता गाजवाविशी वाटते- आपल्यापेक्षां लहान लोकांना ठेचण्यांत मौज वाटते... तरीहि बरें, या लोकांची जीवनावर सत्ता नव्हती. ही गोष्टहि माणसांच्या आधीन असती, तर मग मात्र जगाचें रहाटगाडगें वेगळ्या रीतीनें चाललें असतें... मृत्यूचें मांजर कुठेंहि म्यांव करतांच– सारें जिवंत उंदीर घाबरत होते, थोड्याच वेळांपूर्वी त्यांनी हे बघितलें होतें. तुटपुंज्या सामर्थ्याच्या बळावर माणसें व्यवहारांत असं कसं वागूं शकतात, याचें त्यांना नवल वाटत होतें...

...केवळ जगणं हेंच वस्तुमात्राचं आद्यकर्तव्य असेल, तर मग इतर वस्तूंना कांहींच अर्थ उरणार नाहीं... झाडाच्या फळाला फक्त अर्थ असेल तर मग फांद्या, पानें, फुलें नि मुळ्या या सर्व गोष्टींना कांहींच

किंमत उरणार नाहीं. मुळयांमुळें झाड आहे– झाडामुळें पानें, फुलें नि फळें आहेत.या साऱ्या गोष्टी वेगवेगळया केल्या तर त्यांना कांहीं एक सलग अस्तित्व राहात नाहीं. हीं सारीं आहेत म्हणून वृक्ष आहे आणि वृक्ष आहे म्हणून यांनाहि अस्तित्व आहे. मग त्यांना शंका पडली कीं एका विशिष्ट वस्तूला वृक्षच कां म्हणावं ? दोन हात, दोन पाय, दोन डोळें, दोन कान, एक नाक, एक तोंड असलेल्या आकृतीलाच माणूस कां म्हणावं ? यांतील प्रत्येक गोष्ट स्वतंत्र आहे नाक म्हणजे मनुष्य नसेल, पण मनुष्य म्हटल्यानंतर नाक हें असणारच ! आणि मग त्यांना वाटलं कीं हें असंच असावं...

अन् परत तें वासरूं त्यांच्या डोळयापुढें घोटाळावयास लागलं. गाय हंबरतांच तें कुठून तरी– कशासाठीं तरी– धांवत आलें ! ही ओढ कां निर्माण व्हावी ? यांत कांहीं तरी संवादित्व आहे...या संवादित्वामुळें आकर्षण निर्माण होत असावं– म्हणजे एक जीव दुसऱ्या जीवाकडे आकर्षिला जातो. यामागें कांहीं फार मोठें रहस्य नाहीं. परस्परांकडे आकर्षित होणं हें भावनेचं लक्षण आहे. अरे ! खरंच कीं– मघापासून हा विचार आपल्या कसा काय डोक्यांत आला नाहीं, याचा भाऊरावांना अचंबा वाटला. या साऱ्या उलाढालीमागें कांहीं न कांहीं भावना असते आणि जीवनाची उभारणी भावनेवर झालेली आहे.

भाऊरावांनीं चाळिशी ओलांडली होती. संसाराच्या मोहक जाळ्यांत ते गुरफटले होते. तारुण्यांतील स्वप्नांचं त्यांना विसर पडला होता, आणि अजून बऱ्याच गोष्टी विसरण्याचा ते प्रयत्न करीत होते. ते विसरूं शकले असते तर सुखी नि समाधानी बनले असते. पण तसं होत नव्हतं. त्यांना पुष्कळशा गोष्टी आठवत होत्या अन् त्याच समूळ दुःखांची नांदी बनून त्यांना भेडसावीत होत्या, विचार करण्यास प्रवृत्त करीत होत्या.

सांसारिक जबाबदाऱ्या पार पाडतां पाडतां त्यांच्या नाकीं नऊ येत

होतें. मुलींचें लग्न, मुलांचं शिक्षण, छोटया मुलांचा आजार–पत्नीच्या इच्छा आणि त्यांचें स्वतःचें मनोरथ या साऱ्या समस्या मोटमोठ्या पर्वताप्रमाणें त्यांच्या मार्गात उभ्या होत्या, सेक्रेटरीएटमधील कारकुनीची नोकरी करीत करीत यांना तोंड द्यावयाचें होते– घरीं पाऊल ठेवतांच या सर्व गोष्टींची आठवण येत होती आणि मन भांबावत होतें आणि ऑफिस म्हणजे तर जाणूनबुजून बाजारच होता. पोटापाण्याचे प्रश्न सोडविणारांची तिथें गर्दी होती. त्या गर्दीत प्रत्येक जण स्वतःपुरतें बघत होता. संधि सांपडतांच खालच्या माणसाला मागें ढकलीत होता. जीवनांतील क्षुद्रता तिथें एकवटल्याप्रमाणें वाटत होती. या कात्रींत प्रत्येक जण सांपडत होता. त्याखेरीज मुळीं गत्यंतरच नव्हतें. भाऊरावांना केव्हां केव्हां वाटे कीं हीं सारीं बंन्धनें दूर सारायला पाहिजेत. या सर्व गोष्टींचा विचार करणेंच सोडून द्यावें. अति विचारानें आपणांस वेड लागेल ! पण ते तसें कांहींच करीत नव्हते. प्रत्येक समस्येचा खोलवर विचार करूनहि उत्तर सांपडत नव्हतं, त्या जणूं अनंतकाळपर्यंत मिटणाऱ्या नव्हत्या...अशा वेळीं ते स्वतःवरच चरफडत. आपल्या दौर्बल्याची त्यांना भरपूर लाज वाटें...

पण इच्छा नसतांना ते प्रेम करीत होते. भावनांच्या रेशमी धाग्यांनीं स्वतःला गुरफटून घेत होते, आणि तरीहि त्यांना पश्चात्ताप वाटे. हें सारे पाश झुगारून देऊन एकटं व्हावं असेंहि त्यांना वाटे. निर्विकारपणाचा बाणा अंगीकारून ते शांतपणा निर्माण करण्याचा प्रयत्न करीत होते...

आज सकाळपासून मोठे विचित्र प्रसंग घडत होतें. ते ऑफिसला निघत असतांना, त्यांच्या शाळेंत शिकणाऱ्या मुलानें फीसाठीं पैसे मागितले होते. चार महिन्यांचें थकलेलें घरभाडें मागण्यासाठीं मालकांचा मुनीमहि नेमका आजच आला होता. त्यांची धाकटी मुलगी टॉयफाईडनें फणफणत होती. या गोष्टीनें ते विषण्ण बनले होते. दिवस-

भर या विवंचनांनीं त्यांना ऑफिसचें काम धडपणें करतां आलें नव्हतें. हेडक्लर्कनें तीनचार फाईल्स, परत पाठविल्या होत्या. एका फाईलमध्यें घडलेल्या क्षुल्लक चुकीमुळें वरचा साहेब नेहमींपेक्षां जास्त गुरगुरला होता. त्यानें भाऊरावांचा अपमान केला होता. या साऱ्या गोष्टींच्या त्यांना वेदना होत होत्या, आपल्या क्षुद्रपणाची जाणीव होत होती. इच्छा असूनहि यांतून बाहेर पडतां येत नव्हतें...एका संसारी माणसाची केविलवाणी स्थिति...अंतःकरणांत तीक्ष्ण बाण शिरावेत, आणि तोंडावाटें साधा शब्द काढण्याची पंचाईत पडावी! मनाचा भयंकर आक्रोश चालावा नि चेहेरा मात्र भावविरहित दिसावा...भाऊराव केवढं तरी मोठं दिव्य अगदीं सहजासहजी करीत होते, आणि भोंवतालचं वातावरण बघून निराश होत होते...

ते भारावलेल्या अंतःकरणानें मार्ग आक्रमीत होते. एवढ्यांत दोन रिक्षावाल्यांचें भांडण त्यांच्या कानांवर पडलें. एकाचें गिऱ्हाईक दुसऱ्यानें कमी दरानें घेतलें म्हणून तो सपाटून शिव्या देत होता, आणि तें घाणेरडे शब्द ऐकूनहि कुणाला त्याचें कांहींच वाटत नव्हतें. लोक हंसत हंसत हा प्रकार बघत होते. भाऊरावांनीं हें दृश्य बघितलें आणि त्यांचें मन खदखदा हंसावयास लागलें...प्रथम त्यांना याचा अर्थ समजला नाहीं. त्यांनीं खूप वेळपर्यंत डोकें खाजवलें अन् मग वातावरणांतून वावधानी वाऱ्यासारखे शब्द भिरभिरावयास लागले. "माणूस स्वार्थी आहे–माणूस क्षुद्र आहे–" ते चमत्कारिकपणें भ्याले, स्वतःशींच मोठ्यानें दचकले अन् परत धीट बनले. साऱ्या विश्वाची उभारणी स्वार्थावर आहे बस्स! स्वार्थ.

पुन्हां मघापासून बघितलेलीं सारीं दृश्यें त्यांच्या पुढून झरझर सरकावयास लागलीं. आनंदी पोरींचा घोळका, जर्जर म्हातारा, परीटघडीचे कपडे वापरणारा, स्वच्छंदी जोडपं– लूत लागलेलं कुत्रं जागोजाग अडविणारा पोलीस, मोटारचा अपघात, गाय आणि वासरूं– ते आणि

त्यांचं सबंध कुटुंब– त्यांचं ऑफिस. या सर्व गोष्टी एकमेकांपासून– वेगळया आहेत हा आपला भ्रम आहे– त्या वेगळया नाहींत, प्रत्येकीमागें कांहीं ना कांहीं हेतु आहे. जीवनांतला आनंद लुटण्याचा स्वार्थ पोरींच्या घोळक्यांत आहे. परीटघडीचे कपडे वापरणाऱ्या माणसाची ऐट स्वार्थी आहे. आणि मग म्हातारा माणूस नि तें कुत्रं ? हे प्राणी देखील स्वार्थीच आहेत. म्हाताऱ्यानं भाऊरावांना धक्का मारला होता, त्यांच्या धडधाकट शरीरयष्टीचा त्याला द्वेष वाटला होता. त्यांना जीवनांतील दुःखांची जाणीव करून देण्याचा त्याचा स्वार्थी विचार होता. कुत्रं सुद्धां उपहास करीत होतं...स्वैराचारी माणसांवर पोलीस अधिकार गाजवीत होता. अपघातानें चेंगरलेला माणूस एका भयंकर सत्याचा स्फोट करीत होता. त्याचा मृत्यूदेखील एक प्रकारचा स्वार्थच होता. जगण्यासाठीं धडपडणाऱ्या माणसांविरुद्ध तें एक बंड होतं. परिस्थितीनं लादलं म्हणून नव्हे तर तशी त्याची इच्छाच होती, आपण जाणून बुजून आत्महत्या करीत आहोंत. अशा प्रकारचं चिटोरं त्याच्या खिशांत सांपडलं होतं ! गायीच्या हंबरण्यानं वासरूं येत होतं ! तें दूध प्यायला मिळतं म्हणून त्यामागें कांहीं भावना बिवना नाहीं...त्यांच्या वैयक्तिक अडचणी याहि स्वार्थी होत्या. आपण एका विचित्र मालिकेंत गोवलें गेलों आहोंत, याची त्यांना उपरति झाली, यामुळें कसेंसेंच झालें.

आपल्या या चमत्कारिक विचारांनीं ते परत अस्वस्थ झाले. शून्यांत अत्यंत खोलवर ते शिरूं शकलें नव्हते. त्यांत एकामागें एक भयंकर थरच्याथर त्यांना दिसत होते, आणि तें सारें उपसायचें म्हणजे कांहीं साधीसुधी गोष्ट नव्हती. याच लहानशा विचारानें तें आपल्या मनाचं सांत्वन करीत होते. हेच विचार घोळवीत ते पुढें पुढें जात होते...

रहदारीचा सागर जास्तच उसळल्यासारखा वाटत होता, लाटामागें लाटा वाहत होत्या, आणि त्यांच्या दृष्टीपुढें सिमेंट नि रेती एकत्र करण्याचें यंत्र दिसावयास लागलें. त्याचा अखंड खडखडाट त्यांच्या

कानांत घुमावयास लागला. वितळणाऱ्या संध्याकाळबरोबर त्याचा आवाज मंदमंद होत होता. प्रश्नांचीं वलयें निर्माण होत होतीं आणि त्यांचीं उत्तरें मात्र अज्ञातांत विलीन झाल्याप्रमाणें भासत होतीं. सोनेरी संध्याकाळ पाप केलेल्या पोरीसारखी झाली होती. काळोखाच्या पाय-घड्या क्षितिजापासून उलगडावयास सुरुवात झाली होती. भाऊरावांना घराचे वेध लागले होते. टॉयफाईडनें फणफणणाऱ्या मुलीची "भाऊ!" ही हांक सुरीसारखी त्यांच्या कानांत शिरत होती. लगबगीनें ते पाऊल उचलीत होते....



## ८. स्मृति

रात्रीच्या अंधःकारावर चांदण्याचा व्हॉईटवॉश करण्यांत आलेला आहे. वातावरण हळूहळूं थंडीनें व्यापलें जात आहे. आळसटलेल्या शरीरावर ग्लानीचीं पांखरें घिरट्या घालत आहेत आणि मन मात्र जाड जाड विचारांनीं भारावून गेलेलं आहे...कसें तरी चमत्कारिक आणि एकलकोंडे वाटत आहे... अन् मग असें वाटावयास लागतें कीं, तूं जवळ असायला हवी होतीस. या नीरवतेंत तुला मी पुष्कळ कांहीं सांगितले असते. आणि सतत खुपणारीं शल्यें तुझ्या सहवासांत बोथटलीं असतीं. विचारांनीं भारावून गेलेलें जड मस्तक तुझ्या कुशींत श्रांत *झालें असते...*

पण तुझें अस्तित्वच मुळी चंचल होतें. चांचल्याच्या मुलायम भारानें तूं लवथवलेली होतीस–वीजेसारखा तुझा चपळपणा होता, थर्मामीटर मधल्या पाऱ्यासारखी तुझी एकंदर वृत्ति होती. कुठल्याहि गोष्टीचा तूं संयमानें विचार करत नसस-त्याचेच मला मनस्वी वाईट वाटे, तुला मी हें कधीं जाणवूं दिलें नव्हतें, पण हें दुःख माझ्या अंतरंगाच्या अगदी वरच्याच भागांत होतें. तूं कधीतरी आंत डोकावण्याचा प्रयत्न केला असतास, तर तुला याची प्रचीति आली असती. मनांतल्या कित्येत गोष्टी अशा असतात, ज्या दुसऱ्यांनीं स्वतः-हून ओळखाव्यांत अशी एक विचित्र इच्छा असते. त्यांना कुणी गोंजा-रलं म्हणजे बरं वाटतं...

आणि तूं माझी ती आवडती कविता विसरलीस?

'या माझ्या पंखांनी उडण्याचे वेड दिलें.

अन् माझ्या हातांनी घरटें हें निर्मियलें-'

या ओळी विसरणें कसें काय बरें शक्य आहे? जेव्हां आपण नव्या जीवनाच्या सूक्तांचा उद्घोष करत असूं, त्यावेळीं वरेंचसें अशक्य मूर्तिमंत जड रूपानें आवतरल्याचा भास होत असे. माझ्या होणाऱ्या त्या विचित्र कोंडमाऱ्याची जाणीव मी तुला ही कविता म्हणून दाखवून व्यक्त करत असे--मग तुझ्या टपोऱ्या डोळयांतील चंचलपणा क्षणांत अदृश्य होऊन, अश्रूंनी ते थरथरत असत, आणि मी त्यांच्यावर आपले ओठ टेकवीत असे. तूं आपलें मस्तक माझ्या छातींत झुगारून मुसमुसत असस...सृष्टीच्या लयापर्यंत आपल्या प्रेमाची उत्कटता अशीच टिकून राहावी,असें आपणांस वाटत असे. मग मी तुला म्हणायचा 'वेडी रे वेडी!'

तुला मात्र कांहींच प्रत्युत्तर द्यावेसें वाटत नसे. नुसती स्तब्धता.

या तुझ्या स्तब्धतेमुळें मला किती वेदना झाल्या होत्या याची तुला जाणीव नाहीं. तुझ्या माझ्या ओळखीनंतर आणि थोडयाशा सहवासांतच मी तुझ्या व्यक्तिमत्वानें भारावून गेलों होतों. तुझ्या सौंदर्यानें दिपलों होतों. तासन् तास तुझ्याकडे एखाद्या वेडयाप्रमाणें बघत राहवेसे वाटें. आधाशी डोळे तुझं सौंदर्य पिऊन टाकण्याचा प्रयत्न करत असत! तूं माझं जीवन व्यापलं होतंस. पण प्रारंभी अट्टाहासानें मी तुझ्या विचारांना थारा न देण्याचा प्रयत्न करत असें. माझा अहंकार मला यापासून परावृत्त करण्याची पराकाष्ठा करत असे. असें सतत वाटायचें कीं काय म्हणून एवढें तुझ्या आहारीं जावें? तुला माझ्या जीवनांत कशासाठीं एवढें स्थान द्यावें! एक साधी ओळख-थोडासा सहवास-आणि त्याचे परिणाम मात्र इतक्या गंभीर स्वरूपाचे असावेंत?

तूं माझ्या स्वप्नांच्या भूमींत भरून राहिलीस. सारखी माझ्या दृष्टी-

पुढें घोटाळायचीस आणि मी गुदमरून जायचा. एकांताच्या क्षणांत फक्त तुझाच विचार मनांत असायचा. रात्रंदिवस तूं मला त्रस्त केलें होतेस. मग मला असें वाटावयास लागलें कीं मनाची तगमग तुला समजायलाच पाहिजे, अंतरंगाची पाकळी उलगडून दाखवायलाच पाहिजे. हें सारं सांगण्यासाठीं अनेकदां मी तुझ्याकडे आलों-अगदीं समुद्राच्या भरतीच्या लाटेसारखा. पण माझा आवेग तुला बघतांच एकाएकी ओसरून जायचा. ओठांवर रेंगाळणाऱ्या शब्दांच्या गारा बनायच्या.

एखाद्या खडकासारखी तूं निश्चल होतीस. मी कितीतरी वादळांतून जात होतों, आणि तुझे सारे व्यवहार मात्र शांतपणें चालले होते. माझ्या अस्तित्वाचा-तगमगीचा तुझ्यावर कुठलाच परिणाम होऊं नये? तुला मुळीं हृदयच नव्हते!- आणि जिथें भावनांना प्रतिसाद नसतो, मनाची तगमग ओळखणारं संवेदनाक्षम अंतःकरण नसतं-तिथें उगीच जीवनाचे धागेदोरे गुंताविण्यांत काय अर्थ असतो? ज्या वीणेलाताराच नसतात तिथून संवादी सूरांची काय म्हणून अपेक्षा बाळगावी? असें जाणवायचे कीं आपला आवेग निरर्थक आहे-फोल आहे.

पण तूं जेवढा अलिप्तपणा दाखवायचीस, तेवढी तूं अलिप्त नव्ह-तीस. मी बेफिकीर बनण्याचा प्रयत्न करावयास लागलों म्हणजे तूं असं कांहीं बोलायचीस कीं मला परत विचार करावा लागायचा. आशेची तुरळक हिरवळ तुझ्या एकंदर वागणुकींत लवलवायची. तुझ्या मनाचा खडक ठिसूळ व्हायचा. तो आर्द्र झाल्याप्रमाणें भासायचा. माझा जो अट्टाहास असायचा कीं यापुढें तुझा विचारच करायचा नाहीं. तो पार ढासळून जायचा. मन पुन्हां एका अनिश्चिततेच्या हिंदोळ्यावर झोके घेत राह्यचें. तीच तीं स्वप्नें आणि तगमग देखील.

मनाच्या कोंडमाऱ्याला शब्दांच्या जाळ्यांत पकडून तो तुझ्यापुढें मांडावा असें वाटायचें. मी तुला एक पत्र पाठवलें. ती जवळजळ एक

लाचारीच होती. भावनेच्या आहारीं गेल्याचा परिणाम होता. पण त्याखेरीज दुसरा उपायच नव्हता. पत्रांत मी तुला पुष्कळच लिहिलें होतें. पण शद्ब नेहमीं फसवे असतात. त्यांतून भलताच अर्थ काढून तूं माझ्यावर रागावतेंस कीं काय याची मला धास्ती पडलेली होती. मग एका हुरहुरीनें पुनश्च त्रास द्यायला सुरुवात केली. तुला तें वाचून काय वाटेल; याचेच तर्ककुतर्क करण्यांत माझा वेळ जावयास लागला. दोनचार दिवस मी त्याच्या उत्तराची अगदीं चातकाप्रमाणें वाट बघितली. पण तूं कांहींच उत्तर दिलं नाहींस.

तुझी समक्ष भेट घेऊन काय तें निश्चित ठरवून टाकावें; असें वाटावयास लागलें. मनाला अशा प्रकारच्या सतत जांचणींत ठेवण्यांत कांहींच अर्थ नव्हता. पण तुला भेटणें वाटत होते तेवढें सोपें नव्हतें. मला तुझी भीति वाटत होती. तूं जर रागाच्या नजरेनें माझ्याकडे बघितलेस तर त्याला कशी नजर द्यावी, हेंच मला सुचेना. पण त्याखेरीज दुसरा उपाय तरी काय होता? मी तुझ्याकडे आलों आणि अपेक्षेप्रमाणेंच तूं मला टाळतांना दिसून आले. ज्या गोष्टीला मी भीत होतों तीच शेवटीं घडणार असें दिसावयास लागलें. माझ्या असल्या वागणुकीचा तूं तिरस्कार करतेस कीं काय अशी मला शंका येत होती, तसें व्हायला नको होते !

तूं मला टाळण्याचा प्रयत्न करत होतीस. नेहमीप्रमाणें मोकळ्या मनानें तर राहोच, पण औपचारिकपणें देखील तूं कांहींच बोलली नाहींस. तुझ्या मनाच्या खडकावर आणखी थर चढल्याप्रमाणें वाटलें शेवटीं हिय्या करून मीं म्हटलेच – "बोलायचे नाहीं कां ?"

आणि माझ्या या प्रश्नाचंहि तूं कांहींच उत्तर दिलं नाहींस किंचित् भिष्किळपणानें फक्त हंसलीस. माझ्या मनांत असंख्य वादळें उठलीं होतीं–तशावेळीं तुझी ती जिवघेणी मुग्धता आणि धिमेपणा मला किती असह्य झाला होता– याची तुला कुठून कल्पना असणार?

या प्रसंगानंतर मला असें वाटलें होतें कीं आतां सारं संपलं आहे. तुझ्याकडून कितीतरी मोठ्या अपेक्षा बाळगल्या होत्या, अनेक स्वप्नें रंगवलीं होतीं, आणि तूं त्यांचा चक्काचूर केला होतास. रात्रीच्या एकांतांत मी याचा विचार करत पडायचा आणि त्यावेळीं भोंवतालची एकंदर वस्तुजात माझ्याकडे बघून खदूखदा हंसत असल्याचा भास व्हायचा. माझ्या वागणूकीची मला स्वतःलाच लाज वाटायची, भावनेच्या एवढा कसा काय आहारीं गेलों याचाच अचंबा वाटायचा. मग कितीतरी दिवस अन् रात्रीं या शल्याच्या बोंचणींत कंठल्या. एकदां असेंहि वाटलें कीं तुला पाठवलेलें पत्र परत मागावें. मूर्खपणाचा एक पुरावा तुझ्याजवळ तरी असायला नको. माझें तें पत्र तूं आपल्या मैत्रिणींना दाखवशील—आणि तुम्ही साऱ्याच माझ्या बावळटपणावर पोट धरधरून हंसायच्या— माझी टिंगल करायच्या— कदाचित् त्याचं उत्तरहि द्यायच्या अन् त्यांतूनहि माझी थट्टाच केलेली असायची !

आणि खरेंच ! त्या पत्राची चेष्टा करणें कांहीं फारसें कठीण नव्हतें. माणूस भावनेच्या आवेगांत कांहींच्याबाही लिहून जाण्याचा संभव असतो. त्याकडे तेवढ्याच भावनाविवशतेनें बघितलें तर ठीक—नाहींतर कुचाळकीच करावयाची असेल तर वाटेल तशी करतां येण्यासारखी असते. त्या पत्रांतला शब्द न् शब्द मला आठवावयास लागतो, आणि मी स्वतःलाच हंसतों. स्वतःलाच म्हणतों 'वेड्या ! काय लिहिलंस हें ?' म्हणें 'हृदयमंदिरांतील परम मंगल मूर्ति !' 'अपेक्षांच्या वर्तुळाचा मध्यबिंदू !'... मला काय माहित नव्हतें कीं हृदय म्हणजे रबरासारख्या चिवट कातड्याची एक साधी पिशवी असते, आणि ती हालचाल करत असते तोंवरच सारी इन्द्रियें कार्यप्रवण असतात. पण माणूस प्रेमांत पडला म्हणजे तो कवि बनत असतो ! माहित असलेली वस्तुस्थिति विसरून तो अभावितपणें कांहींतरी करून बसतो आणि याची रुखरुख त्याला सदैव अस्वस्थ करत राहते. तुला मत्र पाठवण्यांत मी

खराखरेच चूक करून बसलों होतों. अनेक वेळां मला याचा पश्चात्ताप वाटला आहे. पण पुन्हां असेंहि वाटायचें कीं याखेरीज आपण करूं तरी काय शकणार होतो ? मनाची तगमग सांगता येत नाहीं तर ती लिहून कळवण्याखेरीज दुसरें कुठलें साधन उपलब्ध आहे ?...

एके दिवशीं तूं अचानकपणें मला थक्क केलेंस. तूं स्वतःहून माझ्या-कडे आलीस ! क्षणभर माझा विश्वासच बसला नव्हता. वाटलें, मी स्वप्नांतच आहे. एका भीषण स्वप्नांत ! जिथें एखादा क्रूर राक्षस नुमता धांगडधिंगा माजवतो–साऱ्या भावनांचें गांठोडें बांधतो–अन् अगदीं दूरवर भिरकावून देतो मग मोठ्या आवाजानें हसावयास लागतों ढगांच्या गडगडाटासारखा. अशा वेदना कीं ज्या निद्रेंतहि विसरतां येत नाहींत, आणि जागृतींत देखील. तुझें स्वप्न सुद्धां जिथें वेदना बनलें होतें, तिथें तुझें मूर्तिमंत अस्तित्व कसें बरें असेल ? तूं आलीस आणि असा भास झाला कीं विजेचा लोळच आपल्या पुढ्यांत उभा राहिला आहे. मी स्तिमित झालों होतों, दिङ्मूढ झालों होतों– 'असं वेड्यासारखं काय बघतां आहांत ?' असा तूं प्रश्न केला होतास– आणि पूर्वीसारखीच हंसली होतीस. तुझं तें अविस्मरणीय हास्य !...सॅम्सन घाण्याला जुंपलेला बघून, उमटलेलं डिलायलाच्या मुखावरील हास्य–सबंध रोमला आग लावून, ती शांतपणें बघणाऱ्या नीरोच्या चेहऱ्यावर फुललेलं हास्य–भयंकर, भीषण, क्रूर, निर्दयी...

मी कितीतरी वेळ गप्प होतों. कांहींतरी आठवण्याचा, कांहींतरी सांगण्याचा प्रयत्न करत होतों, परंतु शब्दगंगा आटल्याप्रमाणें वाटत होती. जी वाणी पूर्वी तुझ्या सान्निध्यांत बहरत होती. तिला एकाएकीच बांध पडला होता. मग मी कसेबसे म्हणालो 'तूं–तूं आलीस !' त्यावेळीं क्षीण हास्य माझ्या चेहऱ्यावर उमटले असावें–ओसरून गेलल्या मह-फिलीसारखे...

मला म्हणावयाचे होते कीं; एका बुजलेल्या जखमेवरची खपली

कशासाठीं काढत आहेस? एका अर्धवट राहिलल्या गीताच्या ओळी कशाला पूर्ण करत आहेस? पण मी तसें कांहींच म्हणालों नाहीं. वाटले–दुःखांचा पुनरुच्चार करायचाच नाहीं. फक्त सहन करत राह्यचे–घडत होते तें आणि घडणारेंहि. जीवनाचा मार्ग जर असाच दुःखानीं व्यापलेला असेल– तर त्यासाठीं किती म्हणून कुढत बसायचें? प्रेम हें इतरांना अमृत ठरलें असेल तर आपल्यासाठीं तें विष असेल! तें प्राशन करायचें–पचवायचें–आणि यांतच समाधान मानत राह्यचें...

चेहऱ्यावरचे क्षीण हास्य क्षणार्धांत लोपलें. मनांतल्या भावनांचें तांडव–नृत्य शांत झालें. कांहींच घडलें नाहीं अशा आविर्भावांत मी म्हणालों, "बऱ्याच दिवसांनी आठवण झाली! कांहीं विशेष?"

माझ्या या थंड शब्दांनी तूं क्षणभर भांबावलीस–जणूं या शब्दांवर तुझा विश्वासच बसत नव्हता. तुझी अशी अपेक्षा होती कीं मी खूप खूप रागें भरावें–तुला हाकलून द्यावें–म्हणजे मग तुला क्षमेची याचना करण्याची संधि मिळली असती. माझ्यावर तुझें आत्यंतिक प्रेम आहे हें तुला सिद्ध करता आलें असतें. पण मी तुला ही संधि देवूं इच्छित नव्हतों. यांतून प्रगट होणारा तुझा स्वार्थ मला नको होता. माझ्या मनांतच प्रीतीचे जें घरटें होतें तें ताजमहालाप्रमाणें होतें–उगीचच शब्दांची उधळपट्टी कशासाठीं हवी होती? तरीहि तूं तुझ्या स्त्रीसुलभ हट्टीपणानें म्हणालीस की माझा हा शांतपणा वरदेखला आहे–पण हाहि आक्षेप मी मुकाट्यानें सहन केला होता.

मला बोलका करण्यासाठीं, मी मागें पाठवलेल्या पत्राचा विषय तूं काढलास–पण त्याहि बाबतींत माझ्या वृत्ति थंड बनल्या होत्या–त्यांतली उत्कटता संपली होती. मी तुला एवढेंच सांगितलें कीं तें भावनेच्या भरांत लिहिलें होतें. मला त्याची लाज वाटत होती–आणि वाटतहि नव्हती! त्या मनःस्थितींत ती भावना सत्य होती. मी ती नाकबूल करूं शकत नव्हतों. पण सत्य हें नेहमींच परिस्थितिसापेक्ष असल्यामुळें

आज मला तो एक भासच वाटतों. हेंहि मी नाकारत नह्व्हतों मग तूं विचारलेंस कीं त्या प्रेमाला आज कांहींच अर्थ उरला नाहीं का ? तें सारें खोटें होतें का ? मी तावडतोब होकार दिला असता, आणि तुमच्याशीं विवाहबद्ध झालें असतें–तर आजच्या सारखीच माझी स्थिति केली असती का ?–तुझ्या या प्रश्नांची उत्तरें देण्याचें मी मुद्दामच टाळलें–कारण त्यांचें निश्चित असें उत्तर देणें कठीण होतें. सत्याच्या एकाच अंगाचा तेव्हां मी विचार केला असता–आणि कदाचित् त्यांत बदलहि झाला नसता...आज मी त्याच्या दुसऱ्या बाजूचा विचार करण्याच्या अवस्थेस पोंचलों होतों–आणि ती दुसरी बाजूच मला सत्य भासत होती ...

मी तुला एवढेंच म्हटलें कीं आज तूं एखाद्या गोष्टाची प्रारंभ करायला आली आहेस कां शेवट ? आरंभ करण्याची इच्छा असेल तरच आपण बोलूंयांत–शेवटाचा कांहीं प्रश्नच नाहीं–तो केव्हांच झाला आहे, असें मी गृहित धरलें आहे. माझें जीवन म्हणजे कांहीं प्लॅटफॉर्म नव्हे–निश्चत असें कांहीं ठरवून आली असशील, तरच आपण कांहीं बोलावें...व्यर्थ भांडणें कशाला हवींत...?

तुझ्या पापण्यांच्या कडा ओल्या झाल्या होत्या. रूद्ध कंठानें तूं म्हणालीस 'तुम्ही हृदयशून्य आहांत ! एका प्रकरणाचा शेवटच करायचा असता तर मी कशाला आलें असतें ? तुम्ही अनेक वादळांतून गेलांत आणि माझें जीवन म्हणजे अगदीं संथ आहे असें तुम्हाला वाटतें का ? माझी हीच परीक्षा केलीत ? दुःखें पचविण्याचा हा जो तुमचा पुरुषी बाणा आहे त्या आधीं मला हें विचारायचं आहे कीं हें दुःख कुणी निर्माण केलं ? या प्रकाराला आधिक जबाबदार कोण आहे ? स्त्रियांना चंचल म्हणतां, पण तुम्ही तरी कसें किती स्थितप्रज्ञ आहांत ! थोडासा विलंब लागतांच सत्याच्या अनेक अंगांचं तुम्ही आकलन करायला लागलांत. यापूर्वी याचा कधीं विचार केला होता कां की

एक वेळ दाखवलेल्या सत्याच्या मर्यादित अंगाला कुणीतरी चिकटून बसलेलं आहे ? आपण मोठे विचारी नि सहिष्णु आहोंत हें सिद्ध करण्याचा तुमचा तरी अट्टाहास नाहीं तर अजून काय आहे ?'...

तूं एकदम गप्प झालीस. आपलें मस्तक माझ्या छातीवर टेकवून स्फुंदावयास लागलीस. तुझें हें दर्शन मला अगदींच नवखें होतें. मला वाटलें होतें की तूं सारें विसरली असशील– आणि तूं म्हणत होतीस त्याप्रमाणें खरोखरच मी या कल्पनेनेंच स्वतःच्या भावनांना बांध घातले होते. मनांतील दुःखें अशा उपाया खेरीज विसरतांच येत नाहींत, त्याला मी तरी काय करूं शकणार होतों ?...

'तूं फार उशीर केलास–' असं मी म्हणतांच तूं आवेशानें म्हणालीस कीं तुम्हीं माझी प्रतीक्षा करत जगायचें होतें. खरें प्रेम हें नेहमीं अपूर्णतेंतच असतें...मला सांगावेसें वाटलें कीं वेडे! त्याच आशेवर मी जगत आहे. पण मी तसें सांगितलें नाहीं– कारण तुझी अपेक्षा मला लाख मोलाची वाटत होती– आणि तिच्याविषयीं मी बोललों असतों तर तिचें मोल कमी झालें असतें. माझ्या एकंदर त्याग्यांतून तूं ओळखावेंस एवढीच माझी इच्छा होती...

अनेक दिवस मग हें असेंच चालत राहिलें. मनांतील पाखरांनीं विस्कटलेलें घरटें पुन्हां नव्या जोमानें बांधावयास घेतलें. स्वप्नांचे विखुरलेले ढग पुन्हां एकत्र यावयास लागले. झडलेल्या भावनांना नवी पालवी फुटावयास लागली आणि जडाचें आल्हादांत रूपांतर झालें. क्षणांचे पक्षी भिरभिर उडावयास लागले– आणि या गतीवर जीवनाचा झोका हळुहळूं उंच जावयास लागला. एका रम्य नाटकाची सुरुवात. अंकामागून अंक संपत होतें...सारें आसमंत धुंद भासत होतें. आपल्या स्वप्नांना रंग भरावयास लागला होता. तीं अगदीं एकरूप झालीं होतीं.

एका नव्या जिवनाच्या सकाळचें तें मनोरम दर्शन होतें. भासाचें पटल अंधःकारांत विलीन झालें होतें, आणि ध्यासाचें मंगलगीत कानांत

अमृताचा वर्षाव करावयास लागलें होतें. नव्या जीवनाचीं सूक्तें आपण आळवावयास लागलों होतों, आणि याच आनंदांत हरखून गेलों होतों...माझ्या अपेक्षा उंचावत होत्या, तुझ्या सहवासांत त्या साकारणार यावर माझा दृढ विश्वास होता.

एखाद्यावेळीं साशंकतेचे मेघ उगीचच इकडे तिकडे पळत सुटायचे–वाटायचें कीं ही इमारत अपूर्ण राहिली तर? अशा विचित्र मनःस्थितींत मी कवितेच्या ओळी म्हणत असे–

'या माझ्या पंखांनी उडण्याचें वेड दिलें,
अन् माझ्या हातांनी घरटें हें निर्मियलें'–

तुझा विलक्षण मोह मला अडकावून ठेवील अशी भीति वाटायची. मग तूं म्हणायचीस 'तुमची आशंका फोल आहे–मी तुमच्या प्रगतीच्या आड येणार नाहीं एका निखळलेल्या दुव्याला माझ्या वतीनें पूर्णत्व यावें, हीच माझी मनीषा आहे. मी तुमच्या बाबतींत श्रृंखला ठरणार नाहीं–हें स्मरणांत ठेवा. तुमच्याप्रमाणेंच माझीहि कांहीं ध्येयें आहेत, आकांक्षा आहेत. तुमच्या सहवासांत त्या पूर्ण होतील अशी माझी श्रद्धा आहे...'

तुझ्या या वाक्यांनीं मनावर आच्छादून आलेलीं अभ्रें ताबडतोब निवळून जायचीं– असें वाटायचें की मी तुला उगीचच दुखावलें. तुझें उत्फुल्ल कमल उगीच कोमेजून टाकलें, याची मला रुखरुख वाटायची. मग मी तुझी समजूत घालायचा. तुझें गांभीर्य नाहींसें व्हायचें–परत हास्याचीं फुलें उमलायचीं. सर्व आशंका, दुःखें अशा रीतीनें धुकें बनून नाहींशीं व्हायचीं. निर्मळपणाचा प्रकाश भरून राह्यचा.

आणि हें प्रकाशानें भरलेलें जग कधीं काळवंडेल असें तूं वाटूं दिलें नव्हतेंस. जीवनाचें रम्य नाटक अव्याहतपणें चालू राहील असा तूं विश्वास दिला होतास. निराश विचारांपासून तूं माझ्या मनाला परावृत्त केलें होतेस. जीवनाच्या धाग्यांत भावनांचीं फुलें गुंफली होतीस. सर्व

गोष्टीविषयीं मी निःशंक बनलों होतों. सारासार विचारशक्तीला मी दूर लोटून दिलें होतें ...

एके दिवशीं तूं नेहमी प्रमाणेंच माझ्याकडे आलीस. तुझें आगमन त्या दिवशीं मला कांहीं निराळेच भासलें.तूं मनांत कांहीं तरी जुळवाजुळव करा वयास लागली होतीस. ओटांबाहेर पडणाऱ्या शब्दांच्या कडूपणामुळेंच कीं काय तुझा चेहरा अगदीं म्लान झाला होता.तुझी चाल तुझा चेहरा, तुझी वृत्ति कुठल्यातरी दडपणांतून जात आहे असा भास होत होता. नेहमींचें गोड बोलणें नाहीं, स्वप्नें रंगवणें नाहीं– कांहीं नाहीं. मग कुठल्यातरी निश्चयानें तूं शब्द उच्चारलेस– 'मी आज आपल्या नाटकाचा शेवट करावयाला आलें आहे– यापुढें मी तुम्हाला भेटूं शकणार नाहीं– मला विसरून जा! परिस्थितीपुढें मी दुबळी ठरलें आहे– मला क्षमा करा!' हे शब्द माझ्या कानांतून बुद्धीपर्यंत कितीतरी वळणें घेत गेलें आणि तेवढ्याच वळणावळणांनीं त्यांचा अर्थबोध झाला. एकंदर वृत्ति बधिर बनली. सारी जिवंतता गोठून गेली होती. जागृतीचें विस्मरण पडलें होतें. माझ्या मनांतून शब्द निनादत होते 'कां? हें सारं कां?' पण तें तिथेंच अडले होते. ओटांबाहेर पडत नव्हते. मी सुन्न होवून वेड्या-सारखा तुझ्याकडे बघत होतों. कानावर एक गुदमरलेला हुंदका आद-ळला होता आणि दृष्टीसमोरून तुझी आकृति दूर दूर जात होती– खूप दूर...

मग एकाएकीच भडभडून आलें. जें घडलें तें एवढें आकस्मिक होतें कीं तिथे विचारशक्ति काम करूं शकत नव्हती. तुझ्यापायीं आधीच एक दुःख सहन केलें होतें. त्यावेळेला मनाला मारावें लागलें होतें, आणि आता मारण्यासारखें, नष्ट करण्यासारखें कांहीं राहिलेच नव्हतें, मध्यंतरी घडलें तें सारें फसवें होतें; फोल होतें. जें नाटक रम्य होतें असा विश्वास होता; ती चूक होती– एका भीषण दुःखांतिकेचा तो एक गोड प्रारंभ होता, याची जाणीवच नव्हती! भव्य स्वप्नांचें

जें शिल्प खोदलें तें सारें ठिसूळ खडकावर होतें, याची विस्मृति पडली होती. ज्याला जागृति समजलों होतों, ती एक दीर्घनिद्रा होती— वेडयावांकडया स्वप्नांनीं भरलेली— आणि मग मनाचें आर्त कढ उसळून येऊं देण्यांत तरी काय स्वारस्य होतें ?

'हें कां घडलें?' हा एक वेडा प्रश्न होता— जें घडलें तें सत्य होतें— संपूर्ण सत्य होतें—आणि विचारांना तें झेपण्यासारखे नव्हतें...मग जविन वेडयाप्रमाणें बनलें असेल तर त्यांत नवल कसलें ! पण हें वेड शांतीचें नाहीं—जाणीवांचा अद्याप विसर पडत नाहीं. त्या शल्य बनून रात्रंदिवस मनाला टोचत असतात. अस्वस्थ करतात. दुःखांचें चित्कार उमटतात आणि मनाच्या घुमटांत सारखें त्यांचेंच प्रतिसाद निनादत असतात...

तूं सारें कांहीं सांगितले असते तर मी तुला स्वतः आनंदानें निरोप दिला असता. अगदीं निर्विकारपणें प्रीतीचा सोहळा तिच्या विसर्जनांत साजरा केला असता. मी तुला फार जपलें होतें. कधींच माझी दुःखें जाणवूं दिली नव्हतीं. तूं एकाएकीच माझा निरोप घेतलास? मला शेवटीं फसवायचेंच होते का?... त्यालाहि माझा विरोध नव्हता. लपंडाव खेळायच्या हेतूनें जीवनांत आली असतीस, तर क्षणाचा खेळ म्हणूनच तुझा विचार केला असता.परंतु तूं फार भयंकर खेळ खेळलीस— भावनांचा ! ही एवढी निर्दयी थट्टा न करायला पाहिजे होतीस— काय मिळवलेंस तूं ? काय ?...

माझ्या तुटलेल्या भावनांच्या धाग्यांना अश्रूं ढाळीत मी एकत्रित करतों आहे— वंचित मन तुला शाप देण्यासाटीं आसुसलेलें आहे— पण मी त्याला सतत मारतों आहे. मी पश्चात्तापाच्याहि पलीकडील अवस्थेस पोंचलों आहे. तुला जीवनांत एका भयंकर स्मृतीचें स्थान प्राप्त झालें आहे. तुझ्या त्या स्मृतीनेहि दाहकतेला शांतविण्याचा माझा प्रयत्न असतो.

— पण जेव्हां रात्रीच्या अंधःकारावर चांदण्याचा व्हाईटवॉश होत

असतो–तेव्हां असें वाटतें कीं माझ्या काळवंडलेल्या जीवनावर तुझ्या स्मृतीचें चांदणें पसरत चाललें आहे... मग उगाचच वेदना वाढत जातात, अन् असें वाटावयास लागतें कीं तूं जवळ असावयाला हवी होतीस– या नीरवतेंत तुला मी पुष्कळ कांहीं सांगितलें असतें, आणि सतत खुपणारीं शल्यें तुझ्या सहवासांत बोथटलीं असतीं...!



# १०. भार

बाबीच्या लग्नाचें ठरतांच वत्सलाबाईंना मनावरील एक कवढेतरी मोठें दडपण नाहींसें झाल्याप्रमाणें वाटलें. तिचें किती कौतुक करूं न् किती नको असें त्यांना होऊन गेलें. रात्रंदिवस त्यांना या गोष्टीनें घेरलें होतें. उठतां बसतां–ध्यानीं–मनीं–स्वप्नीं अन् जागृतींतसुद्धां, बाबीच्या लग्नाची त्यांना काळजी पडली होती...

बाबीला न्हाण यऊन पांच वर्षे होऊन गेलीं होतीं. त्यांनी तेव्हांपासूनच बाबीच्या वडिलांच्या–अप्पांच्या–मागें स्थळें बघण्याचें टुमणें लावलें होतें. पण अप्पा ती गोष्ट मनावरच घेत नव्हते. बाबीचें अंग हळुहळूं भरत होतें, अन् तिच्या त्या वाढत्या अंगाबरोबर वत्सलाबाईच्या काळज्यांहि वाढत होत्या. बाबी उफाड्याची पोर होती. ती अठरा वर्षांची झाली होती, पण ती अगदीं एखाद्या बाईसारखी दिसावयास लागली होती. मायलेकी बरोबरीनें चालावयास लागल्या म्हणजे ओळखणें कठीण होऊन जाई. बाहेरचें लोकच नव्हे तर घरांतील माणसें देखील एखाद्यावेळीं चकत असत. बाबी पाठमोरी उभी असली म्हणजे कित्येकदां अप्पा "अग ! ए ऽ" अशाप्रकारची पत्नीला संबोधिण्याची हांक तिला मारत नि तिनें "काय अप्पा ?" असें म्हटलें म्हणजे "अरेच्या ! तूं आहेस कां ?" असे म्हणत- बाबी अगदीं थेट वत्सलाबाईच्या तोंडवळ्यांवर गेली होती...आणि तिचं एकंदर आयुष्यहि आपल्याप्रमाणेंच जावं अशी वत्सलाबाईची इच्छा होती...

तिचें लौकर लग्न व्हावें असा जो त्यांनी ध्यास घेतला होता तो देखील त्यांच्या या विचित्र इच्छेमुळेंच निर्माण झाला होता. त्यांचें स्वतःचें लग्न त्यांना कळावयास लागण्याच्या आंतच झालें होतें. त्यावेळीं त्या अवघ्या दहा एक वर्षांच्या असाव्यात. अप्पांचे वयहि तेव्हां पंधरा वर्षांपेक्षां जास्त नव्हते. तो काळ आठवला म्हणजे त्यांना अजूनहि मोठी गंमत वाटत असते. एखाद्यावेळीं त्या सहजच म्हणायच्या, "बाबी आतां फार मोठी झाली आहे हं–तिचें लग्न यंदा व्हायलाच पाहिजे!"

त्यांची म्हातारी सासू जवळपास कुठें असली म्हणजे म्हणायची, "अशी किती मोठी झाली आहे ग बाबी? लहान तर आहे लेकरू अजून! लहान मुलींना वागवून घ्यायला साऱ्याच सास्वा कांहीं प्रेमळ नसतात. तूं लग्नानंतर सुद्धां अंथरूणें ओलीं केलीं आहेस! माझी लाडकी होतीस म्हणून निभावलं. आजच्या सास्वा नाहीं करायच्या हो एवढं!"

सासूबाईंचें हें वाक्य ऐकलें म्हणजे साऱ्या घरांत हंशा पिकायचा. अप्पा, बाबी तिच्या पाठचें भाऊ नि चंदू–सारी मंडळीं हंसायला लागायची. वत्सलाबाई लाजून जायच्या–"इश्श! काहींतरीच सांगतां तुम्ही" असं म्हणायच्या.

या प्रकारांमुळें अप्पा बाबीचें लग्न लांबणीवर टाकत होते. सर्वांच्या मतें ती अद्याप लहानच होती. परंतु वत्सलाबाईंना मात्र हल्लीं सुखानें झोंप लागत नव्हती. आपलं जसं लहानपणींच लग्न झालं, तसंच बाबीचंहि व्हावं असं त्याचं मत होतं. पण त्यांचं कुणी ऐकतच नव्हतं. बाबीच्या वयांत त्या आईसुद्धां झाल्या होत्या आणि बाबी मात्र अजून सर्वांना लहानच वाटत होती. एवढ्या उशिरा लग्नें केली म्हणजे संसार व्हायचा कसा–याचाच त्यांना प्रश्न पडायचा.

अप्पा दिवसभर कामासाठीं ऑफिसांत गेलेलें असायचें, मुलें शाळेंत

गेलेली असायची, सासुबाई कुठें तरी देवळांत पोथीसाठीं गेलेल्या असायच्या. बाबीला देखील शाळा होती. वत्सलाबाई घर कामांत वेळ घालवत. त्यांतून त्यांना केव्हां संधि मिळायचाच अवकाश कीं बाबीचें विचार त्यांच्या मनांत येत. तरणीताठी पोर एकटीच शाळेंत जाते, शाळा आपल्या घरापासून बरीच दूर आहे–तिच्यासंबंधीं त्यांना उगा-चच काळजी पडे. मनामध्यें नाहीं नाहीं तें विचार गर्दी करत. पोरीला रस्त्यानें जातांना एखादा मवाली धक्का मारत असेल, किंवा तीच कुणाचा हात धरून पळून जाते कीं काय!... असल्या प्रकारच्या विचित्र शंका त्यांच्या मनांत थैमान घालत. साडेचारच्या टोल्याला बाबी घरांत हजर झाली तर ठीक नाहींतर त्यांना कांहींच सुचेनासें होई. आपल्या मनांतील या शंका त्या कुणाला बोलूनहि दाखवूं शकत नसत. त्या तेवढ्यांतल्या तेवढ्यांत दोनतीन वेळां तरी दारापर्यंत जाऊन येत. कमालीच्या बावरून जात.

अशा वेळीं कुणी घरीं असलं म्हणजे, त्यांची ही घालमेल ताबडतोब त्याच्या लक्षांत येई. एखादी शेजारीण बसायला आलेली असली म्हणजे ती चेष्टेनें विचारायची–" काय वत्सलाबाई–स्वारीच्या आगमनाची वाट बघता आहांत वाटतं " !

मग त्या म्हणायच्या, ' नाहीं हो ! बाबी कशी नाहीं आली अजून शाळेंतून " ?

ती शेजारीण मात्र बेफिकीरीनें म्हणायची, ' आमची सुशीला पण नाहीं आली अद्याप, असेल शाळेंत कांहीं सभा संमेलन.' शेजारणीच्या या बेफिकीरपणाचें त्यांना आश्चर्य वाटायचें. सुशिलाहि तरुणच होती. बाबीपेक्षां थोडीशी मोठीच– तिच्याबाबत मात्र कुणालाच कधी काळजी वाटत नाहीं; याचा त्यांना अचंबा वाटायचा. त्यांना स्वतःला मुलीच्या लग्नाची कोण चिंता पडली होती, पण शेजारी मात्र अजून कसल्याच हालचाली सुरू झाल्या नव्हत्या. त्यांनीं आपली ही शंका

वारंवार बोलून दाखवली होती, पण तरीहि त्यासंबंधीं गंभीरपणें विचार करण्याची त्या लोकांना आवश्यकताच भासत नव्हती. उलट ती शेजारीण म्हणायची, "अहो! आजकाल आपल्याला गरजच राहिली नाहीं स्थळें बघण्याची, त्यांच्या त्याच व्यवस्था करतात सारी. आमच्या घरचा विचार तर सुशिलेला कॉलेजांत घालण्याचा आहे. बी. ए. होईपर्यंत मुळीं लग्नच करायचें नाहीं असें आमची सुशिलाहि म्हणत असते."

हें असं कांहीं ऐकलं म्हणजे त्यांना काय बोलावें हेंच सुचत नसे. मुलींना एवढं शिकवण्याची गरजच काय आहे, हेंच त्यांना समजत नव्हते. त्यांना स्वतःला लिहिण्यावाचण्यापुरतें मराठीचें ज्ञान होतें. शिक्षणाच्या अभावी त्यांचं आयुष्यांत कुठं कांहींच अडलं नव्हतं. बाबीला देखील शाळेंत घालण्याचा त्यांचा विचार नव्हता. परंतु अप्पांचें असें म्हणणें होते कीं आजच्या मुलींना शिक्षण हें आवश्यक आहे. ती जर शिकली नाहीं तर तिचं लग्न होणं कठीण आहे. वस्तुतः लग्नाचा आणि शिक्षणाचा काय बरें संबंध होता? एवीतेवी शाळेंत संसार कसा करावा, याचं ज्ञान तर पोरींना मिळतच नव्हतं, त्या बाबतींत बाबीची प्रगति त्यांना सुपरिचित होती. ती अधुन मधून इंग्रजी शब्द उच्चारित असे. बस्स – तेवढं मात्र बघून घ्यावं! पण या इंग्रजीचा पुढें काय उपयोग आहे? आजकालच्या मुलांना म्हणे इंग्रजी शिकलेल्या मुली पाहिजेत...जसं कांहीं रात्रंदिवस त्याच भाषेंत बोलत बसणार असतात कीं नाहीं! इंग्रजी येण्यापेक्षां बारा माणसांचा स्वयंपाक करतां येणें, ही त्यांच्या मतें आवश्यक गोष्ट होती. मुलींनी गृहकृत्यांत तरबेज असांव, यावर त्यांचा कटाक्ष होता. त्यांचे सारें प्रयत्न या दिशेनें चालायचे...

याच शिक्षणाचें आणखी दुष्परिणाम म्हणजे, स्वतः मुलींहि लग्नाविषयीं बेफिकीर बनावयास लागल्या आहेत. त्याच आपल्या नवऱ्याची निवड करतात म्हणे! असंहि कधीं शक्य आहे काय? मान–मरातब,

रूढी, याहि गोष्टींना जीवनांत कांहीं स्थान आहे कीं नाहीं? आईबाप असतात कशाला? त्यांच्या शेजारचें कुटुंब हें कोकणस्थांचें होतें. त्यांची एकंदर विचारसरणी ही अशा प्रकारची असायची. वत्सलाबाईंना असलं कांहीं ऐकलं म्हणजे पोटफुगी झाल्याप्रमाणें व्हायचें.

या लोकांचें कांहीं असो, आपण मात्र आपल्या मार्गानें जावयास पाहिजे, असा त्या निश्चय करीत. ज्या मार्गानें त्यानीं आपलं आयुष्य कंठलं होतं तो मार्ग सोडण्याची त्यांची इच्छा नव्हती.

बाबी शाळेंतून हंसत हंसत यायची नि मग वत्सलाबाईंचा जीव भांडयांत पडायचा. त्या तिच्यावर थोडयाशा रागावल्याप्रमाणें म्हणायच्या– 'इतका वेळ कुठे गेली होतीस ग?' बाबीला आईच्या सर्वच गोष्टींची चेष्टा वाटत असे. तिच्या भोळया स्वभावाची बाबी टिंगल करीत असे. आपल्याकडे आई नेहमी कुठल्या तरी शंकेनें बघत असते, याचीहि तिला जाणीव होत असें. तिच्या या असल्या वागणुकीच्या मुळाशीं असलेलीं कारणें न समजण्याइतपत ती कांहीं दुधखुळी नव्हती. परंतु आई समजते तेवढं तें गंभीर नाहीं, असें तिचें मत होतें. तारुण्य आणि सौंदर्य म्हणजे कांहीं माणसांचा अपराध थोडाच आहे?... ती कांहीं तरी सांगायचें म्हणून, उत्तर द्यायची– 'अग! आज किनई आमचा एक्स्ट्रा क्लास होता, थांबावं लागलं झालं शाळेंतच–' तिच्या या एक्स्ट्रा क्लास वगैरेच्या भानगडी त्यांना समजत नसत, पण पोरगी शाळेतच होती याचं त्यांना समाधान वाटायचं...बाबीच्या खूप मैत्रीणी होत्या, पण त्यांच्या घरीं वारंवार जाण्याची तिला बंदी होती. पोरी घराबाहेर फार वेळ राह्यला लागल्या म्हणजे त्यांचें पाऊल वांकडे पडण्याची भीति असते...यासाठीं आपण जपावयास पाहिजे असें त्यांना वाटे...त्यांची ही जपण्याची वृत्ति दिवसेंदिवस बळावत चालली होती– बाबीला सुद्धां त्रासदायक होत होती. सदान्‌कदा पाळतीवर राह्यचं म्हणजे काय?...

केव्हां केव्हां ती म्हणायची देखील 'इश्श ! हें काय ग आई–तूं बाई भारीच शंकाखोर आहेस इतरांच्या आया बघ, किती स्वातंत्र्य देतात आपल्या मुलींना–' तिचं हें फणकारणं वत्सलाबाईंना खटकायचं, परंतु आपला जाच मात्र त्यांना सोडावासा वाटत नसे. मुलीला थोडसं दुःख झालं तरी चालेल, पण तिनें आपण लावून दिलेल्या शिस्तीनुसार वागायलाच पाहिजे. तारुण्यांत माणसाला कांहींच दिसत नसतं. एका धुंदीमुळें आंधळेपण आलेलं असतं. अशा वेळींच त्याला खरंखुरं जपण्याची आवश्यकता असते. त्यांतल्या त्यांत पोरीच्या जातीला विशेषच जपावें लागतें... बायकांची अब्रु कांचेसारखी असते. तिला केव्हां तडा जाईल याचा नेम नसतो. आणि या सर्व गोष्टी तरी त्या कां करीत होत्या ? मुलीचं कल्याण व्हावं असं त्यांना मनापासून वाटत होतं. वडिलधाऱ्यांचा उपदेश तरुण मंडळीला नेहमीच बावळटपणाचा वाटत असतो. त्यांच्या चिडण्याकडे आपण दुर्लक्ष करायला पाहिजे. मग त्या म्हणायच्या 'हो ! हो ! देत असतील बरं स्वातंत्र्य– पण मी नाहीं उधळू द्यायची माझ्या मुलीला मुलुखावर ! वडिलांचो शिकवणूक वाया जात नसते कधीं– समजलीस ?' असें कांहीं प्रसंग ओढवले म्हणजे त्यांना वाटायचं कीं बाबीचं लग्न उरकायलाच पाहिजे– पोरीला आपलं बोलणं आवडत नाहीं– उगाचच रागाच्या भरांत आपली अवज्ञा केली म्हणजे काय करायचं ?

आणि आतांशी बाबीहि थोडी उंडारल्यासारखीच वागायला लागली होती. वेणीफणी करतेवेळीं ती तासन्‌तास आरशांत आपलं प्रतिबिंब न्याहाळावयास लागली होती– ती त्यांत डुंबून गेल्याप्रमाणें वाटे. तिला कांहींतरी दिवास्वप्नें पडत असावींत... असं कांहीं बघितलं कीं, वत्सला बाई डाफरायच्या– 'हे काय मेलं आरशांत बघत बसावं– कळवातणी सारखं !' असा शेरा मारायच्या. तशी मग बाबी लाजून जायची आपली ही वागणूक आईच्या दृष्टीस पडूं न देण्याची ती खबरदारी

घ्यायची. पण तिनें तरी काय करावें बरें?– थोडासा एकांत मिळायलाच अवकाश– असें कांहीं विलक्षण विचार तिच्या मनांत गर्दी करून उठत कीं प्रयत्न केला तरी त्यांना विसरणें शक्य नसे. आरशांतला आपला गोरापान चेहरा बघण्यांत तिला गंमत वाटत असे. अंबाडा बांधण्यासाठीं दोन्ही हात मागे नेलें म्हणजे बॉडीच्या आंतून उरोज दिसायचें त्या फुगीर भागाचं आरशांत प्रतिबिंब बघतांच कल्पनाचक्षूंपुढें विचित्र दृश्यें उभीं राह्यचीं. उन्मादक गोष्टी मनांत उसळून यायच्या, असल्या गोष्टी न कळायला ती कुक्कुलं बाळ थोडंच होती! सिनेमांतलें प्रसंग तिच्यापुढून झरझर सरकत. मग कल्पनेनें तीहि एखाद्या गोंडस तरूणाचा चेहरा आपल्या दृष्टीपुढें उभा करी, नि मग त्याच्याबरोबर तिचं मूक संभाषण चाले. या स्वप्नांत एक अवीट गोडी आहे, असा तिला अनुभव आला होता. कल्पनेचा अशा प्रकारचा एक कोश ती निर्माण करावयास लागली होती. मनाची अशी विशिष्ट अवस्था झाली म्हणजे अभावितपणें ती गुणगुणायला लागायची,'सांग तूं–माझा होशिल कां?"– हें सिनेमातलं गाणं तिला कमालीचं आवडलं होतं, तिच्या ओठांवर तें विरघळून गेलं होतं.

तिच्या या असल्या बारीक सारीक गोष्टी इतरांच्या ध्यानांत येत नव्हत्या, आणि वत्सलाबाईच्या दृष्टींतून निसटत नव्हत्या. रात्रींच्यावेळीं अप्पांना त्यांनी अनेक वेळां हें प्रकार सांगितलें होते. पण अप्पा मनांवरच घेत नव्हते. 'बघूंया–बघूंया' म्हणून हा प्रश्न पुढें पुढेंच ढकलीत होते. पत्नी भलताच आग्रह करावयास लागली म्हणजे एखाद्यावेळीं ते चिडत होते–"हें बघ उगी माझें डोकें दुखवूं नकोस–तुला फार काळजी वाटत असेल, तर करून टाक तूंच व्यवस्था सारी. मला कांहीं विचारूं नकोस–"

असं कांहीं ते बोलले म्हणजे वत्सलाबाई निरुत्तर होऊन जात. आपली मुलगी वाहवत जाण्याच्या पंथाला लागली आहे हें त्या

कसें सांगू शकत होत्या? 'ती फार वाढली आहे नि तरुण पोरी आई-बापांच्या गळयांत धोंड असतात' हा त्यांचा एकच मुद्दा होता. त्या या मुद्यावर आल्या म्हणजे अप्पा सांगायचे– 'ती माझीहि मुलगी आहे, धोंड वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. योग्य वेळ आली म्हणजे साऱ्या गोष्टी होतील व्यवस्थितपणें.'

"आणि अजून एक सांगून ठेवतो–" अप्पा म्हणायचे– "तुम्ही पोरीच्या बाबतींत कुठलीच काळजी करूं नका, तिच्या हांतून कांहीं चूक होईल, असं मला वाटत नाहीं, पोरवयानुसार थोडीशी अल्लडहि असणारच, त्याकडे आपण नको कां कौतुकानें बघायला?"

खरं म्हणजे आतां तिच्या वागणूकीकडे कौतुकानें बघावयाचें दिवस तरी होतें कां हें? अप्पांच्या उत्तेजनामुळें बाबी थोडीशी चढून गेल्या-प्रमाणें वागायला लागली होती. आई आपली एखाद्या लहान मुलाप्रमाणें काळजी घेते हें तिला आवडत नव्हते. आपणास साऱ्या गोष्टीं समज-तात, अशी तिची समजूत होती. क्षुल्लक क्षुल्लक गोष्टीं आईनें आप-ल्याला शिकवण्याची आवश्यकता नाहीं असें तिला वाटे. कुठें सिने-मांतले गाणेंच म्हणूं नको, आरशांतच बघूं नको, मैत्रिणीकडे जावूं नको, नि रस्त्यानें वर बघूं नको–याहि कांहीं शिकवण्याच्या गोष्टीच आहेत? आईची ही निरर्थक भीति नि वेडगळ समजूती बाबीला रूचत नव्हत्या.

एखाद्यावेळीं तिची आई या साऱ्या गोष्टी तिच्या मैत्रीणींच्या समोर सांगायची, बाबीला यामुळें लाजल्यासारखें होई. मैत्रिणी तिला शाळेंत भरपूर चिडवत – 'तुझी आई भारीच सनातनी आहे बाई!' असल्या प्रकारचा शेरा ऐकला म्हणजे तिला मेल्याहून मेल्यागत होऊन जायचं. तिच्या वर्गातील एकदोन मुलीं किती तरी पुढारलेल्या होत्या. त्या रात्रीच्या खेळाला सुद्धां एकट्या जात असत, आणि त्या प्रेमदेखील

करत होत्या म्हणें ! त्या अशा कांहीं मजेदार गोष्टी सांगत कीं तसलें प्रकार करून बघण्याचा मोह अनावर व्हावा...बाबीच्या मनावर याचा परिणाम व्हायचा. आपणहि असें वागलों तर कुठें बिघडते हें तिला समजत नव्हतें. आईच्या रागाची पर्वा न करतां, यांतली गोडी अनुभवावी असें तिला वाटे. सारींच माणसें अशी वागतात तर त्यांत वावगं काय होतं ?...

वत्सलाबाई जों जों तिची काळजी घेत होत्या— जपत होत्या, तों तों ती जास्त बंडखोर बनावयास लागली होती. ती हल्ली खूपच नट्टापट्टा करत होती, आणि बेछूटपणें वागत होती.

तिचा धाकटा भाऊ पंधरा सोळा वर्षांचा होता, आणि त्याचें बरेंच मित्र त्यांच्या घरीं येत. ती या मुलांबरोबर गप्पा मारावयास लागली, त्यांच्याबरोबर पत्ते नि कॅरम खेळावयास लागली. पुरुषांच्या सहवासाचं तिला जबरदस्त आकर्षण जडत होतं. तीं मुलं नुकतीच तारुण्याच्या उंबरठ्यावर आलेली होती. थोडासा चावटपणा करीत होती, आणि त्यांचा तो चावटपणा बाबीला मात्र अत्यंत हृद्य वाटत होता. लैंगिक विषयाला वाहिलेली कांहीं चटोर मासिकेंहि ती चोरून मारून वाचावयास लागली होती !

तिच्या या गोष्टी कौतुक करण्यासारख्या होत्या कां ? अप्पांना यांतली कुठलीच गोष्ट माहीत नव्हती, आणि स्वतः वत्सलाबाईंनींहि त्यांच्या कानांवर कांहीं घातलें नव्हतें. सांगून सवरून त्याचा जर कांहींच उपयोग होत नाहीं, तर मग उगीच आपलें तोंड दुखवा तरी कशाला ? सर्व प्रकारांत यापुढें मुळींच लक्ष घालायचं नाहीं असं त्या ठरवीत, निश्चय करत, बाबीला अगदीं स्वैरपणें वागूं देत. तिच्या कुठल्याच गोष्टीवर लक्ष द्यायचं नाहीं, असं हि त्या ठरवीत. आई आपल्यावर राग करते आहे, याची बाबीला जाणीव व्हायची. तिला आपण उगीचच दुखवीत आहोंत, असंहि क्षणभर वाटायचं; पण आईच्या मताप्रमाणें

वागायचं म्हणजे जीवनांतल्या खऱ्याखुऱ्या आनंदाला आपण मुकतों आहोंत असंहि तिला जाणवायचं स्वतःच्या आनंदासाठीं ती इतर गोष्टींकडे दुर्लक्ष करत होती, आपल्या आनंदाचा त्याग करूं शकत नव्हती. भाऊच्या मित्रांना बोलतांना होणारा आनंद, शाळेंतील त्या मैत्रिणींच्या प्रेमकथा ऐकण्याचा आनंद, सिनेमाच्या गोष्टी व ती वाचत असलेल्या मासिकांतील उत्तान स्वरूपाचं वाङ्मय, या साऱ्या गोष्टींमध्यें एक निराळाच आनंद होता, एक निराळीं मस्ती होती. ती अनुभवणें आवश्यक होतें. त्या उन्मादाच्या काल्पनिक सुखानें बाबीचें सर्वांग रोमांचित व्हायचें. रात्रीच्या वाढत्या अंधःकारांत उशीवर डोके ठेवून ती तासन् तास तळमळत पडे. गादीचा मऊपणा तिला बोंचत असे. पुष्कळशा तरुणांच्या आकृति तिच्या नजरेंपुढून सरकावयास लागत. त्यांच्या स्पर्शासाठीं, त्यांच्या संभाषणासाठीं ती आतुर होत होती. त्या स्वप्नांनीं तिची सर्व गात्रें जड होत होती आणि त्यांची गुंगी दिवसाच्या प्रकाशांत सुद्धां निवळत नव्हती.

ती रस्त्यानें चालली म्हणजे अशा कांहीं ऐटींत चाले कीं इतरांचें डोळे तिच्यावर खिळाचें. ती उगाचच आपला पदर सांवरायची—ढळला नसतांना सुद्धां, आणि छाती किंचित् पुढें काढायची. पुरुषांच्या नजरा तिच्याकडे वळल्या म्हणजे तिला गुदगुल्या व्हायच्या.

बाबी तशी भित्रीहि फार होती. पुरुषांचे मागें मागें फिरणें तिला आवडत नसें. तिच्या घरासमोर राहणारा एक तरुण हल्ली तिचा पाठलाग करावयास लागला होता, तो तसा फारसा देखणा नव्हता, पण भाबडा होता. त्यानें आतांपर्यंत तिला एक दोन पत्रें पाठवलीं होतीं. तीं पत्रें वाचतांना तिला खूप आनंद झाला होता. पण त्यांची उत्तरें देण्याची मात्र तिला हिंमत झाली नव्हती. तो तरुण तिला आवडतो कीं नाहीं हें तिला समजत नव्हते, ती त्याचा तिरस्कारहि करत नव्हती आणि कांहीं उत्तरहि देत नव्हती उलट तो पाठलाग करावयास

लागला म्हणजे तिला थोडीशी भीतीच वाटे. पण ती त्याला विरोधहि करत नव्हती. नुसती पारध करण्यांत तिला मजा वाटत असे.

असाच कांहींसा प्रकार भाऊच्या मित्रांच्या बाबतींतहि व्हायचा. ती त्यांच्याशीं अगदीं मोकळेपणानें वागे, ती मुलें वयानें तिच्यापेक्षां एक दोन वर्षांनी तरी लहान होतीं. भाऊच्या या मित्रांत कृष्णा नांवाचा एक मुलगा होता. तो तिला फार आवडायचा. विशेषत: त्याच्या केसांचं वळण, तो अगदीं दिलीपकुमार सारखें केस वळवायचा. तो दिसायलाहि चांगला होता. ती त्याचाच पार्टनर म्हणून खेळायची खेळण्यांतहि तो मोठा पटाईत होता. तो बोलायचाहि मजेदार. बाबी त्याच्या सह-वासासाठीं हपापायची. त्याच्यावर आपलें प्रेम जडत आहे कीं काय अशी तिला शंका यायची. त्याचं आपल्याला एक विलक्षण आकर्षण आहे हें मात्र तिला जाणवत असे.

थोडयाच दिवसापूर्वीं एक विचित्र प्रसंग घडला होता सुट्टीचा दिवस. दुपारची वेळ. सारं घर शांत होतं. भाऊ, चदुं सिनेमाला गेले होते. अप्पा वामकुक्षी करत होते. बाबी कुठलीतरी रहस्यकथा वाचत ओसरीवर पडली होती. तिला आज करमत नव्हते. एवढ्यांत कृष्णा आला, व मग ती आनंदली. तीं दोघें कॅरम खेळावयास लागलीं. त्याच्या खेळावर ती नेहमीच लट्टू झालेली असे. ती त्याची स्तुति करावयास लागली. वत्सलाबाई आंतल्या भागांत कांहींतरी घर काम करत होत्या. या एकांताचा दोघांवरहि मोठा परिणाम झाला होता. खेळण्यांत नेहमीसारखें लक्ष लागत नव्हते. मग त्यांनी खेळणें बंद केलें. कृष्णा कुठल्यातरी सिनेमाच्या नि क्रिकेटच्या मॅचिसूच्या गोष्टीं सांगावयास लागला. बाबी नुसतचं ऐकत होती. बोलतां बोलतां त्याला काय लहर आली कुणास माहीत-त्यानें बाबीचा हात आपल्या हातांत घेतला. बाबीचा हात थरथरत होता, आणि तोहि कावराबावरा झाला होता. त्यानें बाबीला आपल्या निकट ओढलें, तिला हें सारें आकस्मिक होते,

हवें हवेसें होतें आणि नको नकोसेंहि होतें. भलत्याच वेळेला हा प्रकार घडतो आहे याची तिला जाणीव झाली. मग क्षणांतच तिनें आपला हात खस्‌दिशी त्याच्या हातांतून सोडवून घेतला, व ती ताडकन् उभी राहिली.

अगदीं याच वेळेला वत्सलाबाई ओसरीवर आल्या व हीं दोघेंजण कावऱ्याबावऱ्या नजरेनें त्यांच्याकडे बघावयास लागलीं. बाबी झटकन् आंतल्या खोलींत अदृश्य झाली व कृष्णाहि मुकाट्यानें उठून घराबाहेर पडला. कांहीं तरी अतिप्रसंग घडला असावा, अशी वत्सलाबाईंना शंका आली. त्याहि बाबीच्या पाठोपाठ आंत गेल्या व ' काय झालं ?' म्हणून विचारावयास लागल्या. पण बाबी मैंदासारखी गप्प बसली. 'मला माहीत नाहीं ' असं उत्तर द्यावयास लागली. वत्सलाबाईंना या गोष्टीचा भयंकर त्रास झाला आणि बाबीचा रागहि आला. त्यांच्या साऱ्या अपेक्षांना ही पोरटी हरताळ फांसणार असें त्यांना वाटले. त्या तिच्याशी कांहींच बोलल्या नाहींत.

त्याच दिवशीं रात्रीं त्यांनीं अप्पांना घडलेला प्रकार सांगितला; व आपल्या म्हणण्याची आवश्यकता पटवून दिली. गोष्टी या थराला आलेल्या बघतांच अप्पांनाहि जरासा धक्काच बसला. त्यांनीं करडेपणानें बाबीला या बाबतींत विचारलें. तिच्या वह्या नि पुस्तकें त्यांनीं तपासलीं व एका पुस्तकांत त्यांना दोन चिटोरें सांपडलीं. मग मात्र त्यांच्याहि तळपायाची आग मस्तकाला गेली. आपल्या फाजील लाडानें पोर वाहवत चालली आहे, असें त्यांना दिसून आलें.

दुसऱ्या दिवसापासून ते तिच्या विवाहाचा प्रयत्न करावयास लागले. वत्सलाबाई विशेष कसोशीनें तिच्यावर लक्ष ठेवावयास लागल्या. मध्यंतरीच्या त्यांच्या हयगयीमुळेंच पोरगी अशाप्रकारचं वागायला प्रवृत्त झाली असा त्यांचा ग्रह झाला. त्या पुन्हां रात्रंदिवस तिच्यावर पाळत ठेवावयास लागल्या. तिचं एकदाचं लग्न झालं म्हणजे त्यांना समाधान

मिळणार होतं...

अप्पांच्या प्रयत्नांना लौकरच फळ आलं. तशी बाबी मोठी नशीबवान पोरगी होती आणि या गोष्टीचा वत्सलाबाईंनाहि मोठा अभिमान होता. एका चांगलीशी नोकरी असलेल्या मुलानें बाबीला पसंत केले होते, व लौकरच तिचें लग्न होणार होते...तिच्या लग्नाचें ठरतांच वत्सलाबाईना अनिर्वचनीय आनंद झाला होता. त्या पुन्हां एकवार आत्यंतिक मायनें बाबीकडे बघावयास लागल्या. ती लौकरच हें घर सोडणार म्हणून तिचें भरपूर लाड करावयास लागल्या. येणाऱ्या जाणाऱ्या माणसांपुढें बाबीची स्तुति करावयास लागल्या. तिच्या लग्नाच्या धांदलींत त्या हरखून गेल्या. सामानसुमान, कपडालत्ता, पाहुणें रावळें, या अनेक धांदलीं त्यांच्या मार्गे लागल्या होत्या. या आनंदांत बाबीच्या साऱ्या चूका त्यांनी दृष्टिआड केल्या. तिचें लग्न बिनबोभाटपणें पार पडलं म्हणजे, त्यांच्यावरील ओझें हलकें होणार होते. भार नाहींसा होणार होता. याच विचारांत त्या निमग्न होत्या...

आणि मग एका रात्रीं त्यांना एकाएकीच वाईट वाटावयास लागलें! आणखी चारपांच दिवसांनीं बाबीचें लग्न होणार होते. हळुहळूं पाहुणें मंडळी जमत होतीं, साऱ्या घरांत गडबड आणि गोंधळ सुरू झाला होता. तिच्या लग्नाविषयीं वस्तुतः त्याच उत्सुक होत्या. त्या रात्रीं कामें आटोपून उशीरानेंच वत्सलाबाई अंथरूणावर आडव्या झाल्या. पलीकडे बाबी शांतपणें झोंपली होती. ती आतां परक्यांची होणार हा विचार त्यांच्या मनांत आला आणि मग उरांत कांहींतरी जडजड वस्तु दाटून आल्याप्रमाणें त्यांना वाटलें. आपली कूस रिकामी होणार या विचारानें त्यांना अस्वस्थ वाटूं लागलें. त्यांच्या मनांवरील एक भार कमी झाला होता, आणि पुन्हां एक नवीन भार येऊन पडत होता, आणि यांतून मात्र आपण मोकळया होऊं शकत नाहीं, या विचाराच्या जाणीवेनें त्यांचा सारा उत्साहच एकदम निवळला...

त्या जड अंतःकरणानें जागेहून उठल्या, नि बाबीच्या उशालगत बसल्या. ती शांतपणें झोंपली होती. कुठल्यातरी स्वप्नामुळें झोंपेंतहि एक मंद स्मित तिच्या चेहेऱ्यावर उमटलें होतें. वत्सलाबाई तिचें मस्तक हळुहळूं थोपटावयास लागल्या. एका विचित्र आनंद मिश्रित दुःखानें त्यांचें डोळें भरून आलें होतें, गालांहून अश्रु ओघळत होतें. बाबी मात्र निष्पापपणें झोपली होती.



## १०. स्पर्धा

वातावरणांत नुकतेच कुठें कोंवळ्या उन्हाचें कवडसे विखुरत होते. रस्त्यावर सकाळची प्रसन्नता घोटाळत होती, आल्हादाचा वर्षाव करत होती. सारं विश्व अजूनहि पांघरूणाची ऊब सोडावयास तयार नव्हतं—परंतु श्रमिकांची सकाळ होऊन बराच अवकाश झाला होता. सृष्टीचा निवांतपणा रात्रीच्या काळोखाबरोबर अस्तंगतास चालला होता आणि अंगावर कांटा आणणाऱ्या थंडीला बाजूस सारीत सर्वजण जागे होत होते...

बरेंच दिवस बेकार असलेला सखाराम काडकाड जांभया देत उठला आणि खोलीबाहेर येऊन जगाकडे शून्यपणें बघावयास लागला. वाडयांतील एकुलत्या एका नळावर एकच गर्दी उसळली होती. मळकट विटक्या कपडयांतील म्हाताऱ्या स्त्रिया एकसारखी वटवट करत होत्या. भांडयांच्या आदळण्या आपटण्याचें आवाज त्यांच्या कर्कश शब्दांना संगीत साथ करत होते...

सखारामच्या निरुत्साहाला इथून प्रारंभ होत होता आणि याहि गोष्टीला कधीं अंत असूं शकेल असं त्याला नजीकच्या भविष्यांत वाटत नव्हतं. तो चूळ भरून आंत गेला नि परत कपडे करून, चहासाठीं रस्त्यावरील हॉटेलाकडे निघाला.

वळणावरच्या मुसलमान वस्तींतला दहा वर्षांचा युसूफ गळ्यांत गलोल अडकून त्याच वेळेला समोरून येत होता. त्यानें आपलीं दोन

बोटें जीभेवर ठेऊन एक कर्कश शीळ वाजवली आणि त्यामुळें तुरळक रहदारीला तडा पडला. फूटपाथहून चालतांना सखाराम विचारांत एवढा गढून गेला होता कीं युसूफच्या या शीळ वाजवण्यामुळें तो भानावर आला. आजुबाजूच्या लोकांनीं युसूफकडे बघितल्या न बघितल्यासारखं केलं आणि " कार्ट, काय वाह्यात आहे!" अशा आविर्भावाचा चेहरा केला. युसूफला याची कांहींच दिक्कत नव्हती. तो आपला स्वतःचा राजा होता. मन मानेल तें करायचं आणि कुणाच्या बापाला भ्यायचं नाहीं हें त्याचं धोरण होतं. तो क्षणांत कर्कश शीळ फुंकून स्वतःची करमणूक करी, तर क्षणांतच गळयांतील गलोलानें, विजेच्या खांबावर अथवा रस्त्यालगतच्या इमारतीवर बसलेल्या एखाद्या पक्षाचा नेम धरून खडा मारी– तो बहुधा बरोबर लागायचाच नाहीं. पक्षी उडून जाई आणि युसूफहि भरवेगानें थोडावेळ त्याचा पाठलाग करी अन् एवढ्यांतच रस्त्यावरील एखादी चमकदार वस्तू बघून पक्षाचा नाद सोडून देई. चमचमणारा रंगीबेरंगी कांचेचा तुकडा उचलून तो आपल्या मळक्या सदऱ्याच्या खिशांत ठेवी. त्याची नजर रस्त्याचा कोपरान् कोपरा न्याहळीत असे. पायाळू माणसाला ज्याप्रमाणें जमीनींतील गुप्त धन दिसत असतं त्याप्रमाणें युसूफला रस्त्यावर अगणित संपत्ति विखुरल्यासारखी वाटे. काचेचें तुकडे, घोड्याच्या निखळून पडलेल्या नाला, कागदांचें कपडे, सिगारेटडबींतील चांदी, विडया सिगारेटस्‌ची थोटकं अन् क्वचित् प्रसंगीं एखादं नाणं. या सर्व निरुपयोगी वस्तू युसूफला हिऱ्यामाणकाच्या मोलाच्या होत्या. त्याचं सबंध जगंच निराळं होतं. तिथं धाडसं होतीं, पराक्रम होते, भीति होती, विजय होता आणि पराजय देखील! युसूफपुढें निरनिराळया अनेक समस्या होत्या, त्या सर्वांतून त्याला पार पडायचं होतं– जगांत कांहींतरी करून डोकं वर काढायचं होतं. जगण्यासाठीं सर्वच गोष्टी त्यालासुद्धां हव्या होत्या...

त्याला आजची दिनचर्या निश्चित करावयाची होती. काल रात्रीं त्यानें बऱ्याच गोष्टींचा आडाखा मनाशीं बांधून ठेवला होता. सकाळचा नाश्ता आटोपला म्हणजे तो घराजवळ असलेल्या शाळेच्या फाटकाशीं घुटमळणार होता, पांढरपेशा लोकांची रंगी बेरंगी पोरें त्याला बघावयाची होती. जमलंच तर एखाद दुसऱ्याची मैत्री संपादन करावयाची होती. पेरू विकणाऱ्या बागवानाचीं चारदोन कामें करावयाची होती. त्याच्या मोबदल्यांत एखादा चेंगरलेला अथवा नासलेला पेरू उकळायचा होता, अन् मग तो हळुहळूं खात खात अजून इतर गोष्टींचा विचार करावयाचा होता. सकाळचे मॉर्निंग शोज सुरूं होण्यापूर्वी एखाद्या थिएटरच्या आवारांत भटकून बाहेर टांगलेलीं भव्य चित्रें मनमुराद बघावयाचीं होतीं. तिथं पडलेल्या विड्या सिगारेटस्‌ची थोटकं उचलायची होती आणि घरीं आणून बुढ्या दादाजानला द्यावयाची होती...

घरची आठवण येतांच त्यानें आपला हात झटकन् खिशांत घातला. भराभर साऱ्या वस्तू बाहेर काढल्या आणि खिशाच्या तळाशीं पडलेली एक आणेली बाहेर काढली. ती तळहातावर ठेवून तो कितीतरी वेळ त्या नाण्याकडे बघावयास लागला. आजुबाजूचे लोक त्यावर झडप घालतील या शंकेनें सभोंताल बघावयास लागला. पण लोकांचं मात्र त्याच्याकडे मुळींच लक्ष नव्हतं, तसं त्याला समाधान वाटलं. मग एका आण्याचेंच विचार त्याच्या मनांत थैमाण घालावयास लागले. त्या आण्यांत दोन आईस्फ्रूट्स विकत घेतां आलीं असतीं. खिसाभर भाजलेल्या कुरकुरीत शेंगा, दोन चॉकोलेट किंवा 'पॅरी' ची पांच आंबट गोड पेपरमिंटस् खरेदी करतां आली असती. या सर्व वस्तूंच्या आठवणीनेंच त्याच्या तोंडास पाणी सुटावयास लागलें पण त्याला हा मोह आवरावा लागला, कारण तो एक आणा त्याच्या मालकीचा नव्हता. त्याच्या दादीनं तो सामान खरेदीसाठीं त्याच्याजवळ दिला

होता. दोन पैशाची चहाची पावडर आणि दोन पैशाची साखर न्याव-याची होती. त्यामुळें सकाळचा चहा खोळंबला होता. त्याला झटपट बाजार आटोपून घरीं परतणं भाग होतं.

युसूफ वाण्याच्या दुकानावर पोंचला तो कितीतरी वेळ साऱ्या वस्तूंकडे आशाळभूतपणें बघावयास लागला. खारीक, खोबरे, बदाम, काजू– नाना प्रकारचे खाद्यपदार्थ पुड्यांत दिसत होते. गल्ल्यावर पैसे मोजीत बसलेल्या अगडबंब वाण्याची नजर चुकवून आंत जावं आणि मुठीं भरभरून पदार्थ खिशांत कोंबावे– असा विचार अनेकदां त्याच्या मनांत आला, परंतु तो मूर्त स्वरूप धारण करूं शकला नव्हता. क्षणभर त्याला वाटलं कीं, आपल्या जवळील एक आणा वाण्याला द्यावा अन् सर्व वस्तू खरेदी कराव्यात. पण लेकाचा तो वाणी आपलं ऐकेल किंवा नाहीं, याची त्याला शंका होती. एवढ्यांतच त्या वाण्यानें साशंक नजरेनं युसूफकडे बघत चिरक्या आवाजांत प्रश्न केला–" अबे छोकरे! क्या चाहिये?"

युसूफनें एक आण्याचं नाणं मारे दिमाखानें वाण्याला दाखवत, दोन पैशाची चहाची पावडर आणि दोन पैशाची साखर मागितली. युसूफला आपलं वाटलं की वाणी आतां आपल्याशीं प्रेमळपणें बोलेल, इतर ग्राहकासारखं आपल्याला आंतील बाकावर बसण्याची परवानगी देईल. पण एक आण्यासारखी मोठी रक्कम देऊनहि वाण्याला युसूफची कांहींच किंमत वाटत नव्हती. तसा युसूफला जगाचा अचंबा वाटला. पैसे देऊनहि वाण्यानें आपल्याकडे तुच्छतेनें बघावं, हें त्याला आवडलं नाहीं. त्यानं आपणास "अबे छोकरे!" सारखें अपमानास्पद शब्द उच्चारावेंत, हेंहि आवडलं नाहीं. मग युसूफला वाटलं आपलीच चूक झाली– हा एक आणा त्याला मुळीं दिलाच नसता तर?... तो आपण इतर ठिकाणीं खर्चून टाकावयास पाहिजे होता...

"जाने दो कोई फिकिर नहीं" या आवेशांत युसूफनें वाण्याकडून

दोन पुड्या घेतल्या आणि तो आपल्या घराकडे परत निघाला...

तो टिवल्या बावल्या करत चालावयास लागला, पुडीच्या] छिद्रांतून हातावर साखर ओघळल्यामुळें चिकट बनलेला हात तो वारंवार चाटत होता नि एकदमच पुढून येणाऱ्या सखारामकडे बघून तो उगाच तरी हंसला. या माणसाची कांहीं तरी चेष्टा करावी अन् त्याला त्रास द्यावा एवढाच युसूफचा हेतू होता. आपल्या घराच्या आसपासच हा माणूस राहतो याची युसूफला कल्पना होती. त्यानं जर भांडण उकरून काढलंच तर गलोलानें एखादा खडा त्याला मारण्याचा विचार युसूफनं आधींच आंखला होता. सखाराम त्याच्याकडे कावराबावरा होऊन बघावयास लागला. तसा मग युसूफला जास्तच जोर चढला. त्यानं तोंड वेंगाडून भुंवया उंच केल्या नि आपलं मळकट डोकं उगाच तरी कराकरा खाजवलं. सखारामला त्याच्या या वागण्याचा अर्थच समजत नव्हता. उगीच एखादं अर्वाच्य कार्टं आपली टिंगल करत असेल या उद्देशानें त्यानं आपले डोळे थोडे क्रोधिष्ट केले– "क्यंव बे पोट्टे– बहुत मस्ती आगयी क्या ?" असा त्यानं प्रश्न केला. युसूफचं त्याच्या प्रश्नाकडे नि शिव्याकडे अजिबात लक्ष नव्हतं. तो त्याला मनसोक्त चिडवून आपली करमणूक करून घेत होता. कुणाला तें आवडेल अथवा नाहीं हा विचारच मुळीं त्याच्याजवळ नव्हता. हें बिलंदर पोरगं आपलं कांहीं ऐकत नाहीं असं पाहून सखारामनें धपाटा मारण्याच्या उद्देशानें आपला हात उगारला. मग मात्र युसूफ तिथें क्षणभरहि थांबला नाहीं. मोठमोठयानें हंसत तो केव्हांच पसार झाला. सखारामसारख्या किरकोळ माणसाकडून मार खाण्याची त्याची कदापिहि इच्छा नव्हती. परवां ज्या युसूफनें पोलीसला हातोहात फसवलं होतं– त्या युसूफनें एका सामान्य माणसाचा मार खायचा, म्हणजे चेष्टा होती काय ?...

दोघेंहि मग उलट दिशेनें चालावयास लागले. दोघापुढेंहि अनेक प्रश्न उभे होते. सखारामनें सकाळचा चहा घेत, स्थानिक वर्तमानपत्रं

चाळलीं. 'Wanted' च्या साऱ्या जाहिराती वाचल्या. "कुठल्याशा घरांत स्वयंपाकासाठीं एक बाई पाहिजे" च्या जाहिरातीपासून 'विमा-एजंटाच्या' जाहिराती पर्यंत झाडून त्यानं वाचून काढलं. पण सखा-रामसारख्या बी. कॉम. माणसाला कुठेंच योग्य नोकरी नव्हती. साऱ्या बँकस्, खाजगी फर्मस्, सरकारी खातीं, सर्व ठिकाणीं त्यानें प्रयत्न करून बाघितलें होते. अनेक इंटरव्ह्यूज नि परीक्षा झाल्या होत्या. पण त्यानंतर मात्र कुठं काय होत होतं कुणास माहीत– पण सखारामचं नेमकं नांव अपॉइन्टमेन्टसूच्या यादींत येत नव्हतं. वशिले असणाऱ्यांना ताबडतोब नोकरी मिळत होती. असल्या प्रकाराकडे आश्चर्यानें बघण्या-खेरीज गत्यंतर नव्हतं. आपण एवढी पदवी जीवाची अटापीट करून मिळवली, तिला व्यवहारी जगांत कांहींच किंमत नाहीं हें बघून तो हळुहळूं निराश होत होता. आपण शिक्षण घेतलं हीच सर्वांत मोठी चूक झाली असं त्याला वाटावयास लागलं...

अन् मग एकाएकीच मघाशीं आपणास उगाचच चिडवणाऱ्या त्या मुसलमान पोराची त्याला आठवण झाली. त्याचें तें गलोलानें खडा मारणें, आणि शीळ वाजवणें, उगाचच भटकत राहणें आणि लोकांना चिडवणें या सर्व गोष्टींत आनंद भरलेला होता. तो अनंत पटीनें आपल्यापेक्षां जास्त सुखी आहे असं सखारामला वाटलं. त्या दहा वर्षांच्या पोराला कुठलीच काळजी नव्हती–जबाबदारी नव्हती. त्याच्या वयांत असताना सखाराम शाळेच्या पायऱ्या झिजवीत होता–हट्ट करण्याचा प्रयत्न केला तर वडील मंडळींचा मार खात होता–अन् हा मार चुकवण्यासाठीं तो कुरबूर करत ज्ञानाची प्राप्ति करत होता. युसूफला या पैकीं कांहींच करावं लागत नव्हतं. दारिद्र्यामुळें शिक्षण घेण्याचा प्रश्न नव्हता–ज्ञान मिळविण्याची इच्छा नव्हती. युसूफचा बाप, आजोबा, मोठा भाऊ–घरांतील एकहि माणसाला शिक्षणाचा गंध नव्हता–आणि त्यामुळें कुणाचं कांहीं अडतहि नव्हतं,

आयुष्यभर धाडसं करत राहयची–मग ती कसल्याहि स्वरूपाची असोत...

सखारामला या विचारांनी कंससच झालं. आपण पुष्कळशा बन्धनांत अडकलों आहोंत याची त्याला जाणीव झाली. लहानपणीं इच्छा नसताना शिक्षण घ्यायचं मोठेपणीं नोकरीसाठीं वणवण फिरायचं. अर्धवट ज्ञानाच्या नशेंत भरमसाट मनोरथ करायची नि शेवटीं महान् ध्येय मार्गावर कारकून म्हणून पाऊल टाकायचं–तारुण्याच्या चार क्षणांत एखादा बदल म्हणजे कुण्यातरी पोरीवर प्रेम करायचं–लग्न करायचं! बाळपण, तारुण्य, नोकरी, प्रेम, लग्न! हीच त्याच्या आयुष्याची बॅलेंस–शीट होती. या ठराविक गोष्टी सुद्धां बिनधोकपणें अथवा मुरळीतपणें होत नव्हत्या–त्यांतहि अनेक अडचणी होत्या. तो कुणावर तरी मनांतून चरफडत होता...तशी त्याला वाटलं आपणहि युसूफ सारखं व्हावं गळ्यांत गलोल अडकावी, आणि उनाडक्या करत भटकत राहवं...

युसूफच्या राज्यांत अनेक उलाढाली होत होत्या. थोडयाच वेळांपूर्वी साखर नि चहाची पूड त्यानं आपल्या दादीजवळ दिली होती–ती बुढ्ढी उगीचच चेकाळली. चहाला उशीर झाल्यामुळें ती संतापली होती... चहा प्याल्याखेरीज सकाळच होत नव्हती! एक आणा मिळविण्यासाठीं तिला कितीतरी भानगडीं कराव्या लागल्या होत्या. मोहल्ल्यांतील लोक असें बदमाष होते कीं कुणी तिला एक आणा देखील उसणा द्यावयास तयार नव्हतं. लोकांच्या दारिद्र्यावर दादी खूप तोंडसुख घेई. तेवढ्यांत आंधळ्या बुढ्ढयानं टुमणं लावलं–"बीबी! चाय तयार हुई क्या?" त्याला या साध्या वाक्यानें धांप लागली, आणि कुजून बसलेला दमा वर उसळला. तो मग कितीतरी वेळ खोकत राहिला. आणि युसूफनें आणून दिलेली विडया सिगारेटची थोटकं लागोपाठ ओढावयास लागला... मग युसूफची आई हळूंच

अंथरूणाच्या लक्तराबाहेर आली. सासूनें तयार केलेला चहा पिण्याची तिला मुळीं संवयच जडली होती. म्हातारीचा यामुळेंहि भडका उडे. आयता केलेला चहा ढोसताना तिला लाज कशी वाटत नाहीं, याचचं म्हातारीला नवल वाटे. पुन्हां शिव्याचा मारा सुरू होई... या कौटुंबिक भांडणांत युसूफचा बाप आणि वडिल भाऊ बहुधा भाग घेत नसत हें एका परीनं बरंच होतं. त्यांची आपली रात्रीं प्रारंभ केलेली कामें सकाळपूर्वी संपत असत, अन् म्हणून दुपारपर्यंत ते घोरत असत. स्वयंपाकघरांतील घाण गेल्या कित्येक दिवसांत निघाली नव्हती. मागील ईदला शिजवलेल्या मुर्गीचें अवशेष अद्याप चुलीपाशीं पडलेलें होते. चारदोन कोंबडया इकडे तिकडे दाणें टिपण्याचा प्रयत्न करत फिरत होत्या आणि त्यांचा आवाज चालला होता. मग तीन-चार कप तयार केलेलें गरम पाणी पिण्याबद्दल अनेक भांडणें सुरू होत. युसूफ या सर्व प्रकाराकडे खेळकरपणें बघत असे. दादी आणि अम्माजान कां भांडतात -अथवा म्हातारा दादा या लोकांवर कां संतापत असतो-हें त्याला समजत नसे. त्याचप्रमाणें अब्बाजान आणि बडेभाई रात्रीं कुठल्या कामासाठीं बाहेर जातात याचीहि त्याला कल्पना नसे. हें सारे लोक धाडसी आहेत एवढं तो समजून होता. गल्लींतील कुठल्याहि बाईची आपल्या दादीबरोबर आणि अम्माजानबरोबर भांडण्याची हिंमत नाहीं एवढं तो आळखून होता. बापाला आणि भावालाहि बरेंच लोक घाबरतात हेहि त्याला माहीत होतं आणि म्हणूनच या सर्व लोकां-पेक्षां आपण कांहीं तरी दिव्य- भव्य करून वडिलोपार्जित कीर्तींत भर टाकायला पाहिजे असं त्याला वाटे-- निदान कांहीं नाहींतरी सकाळच्या चहाचा प्रश्न तरी हमखास मिटवायलाच पाहिजे...आपणाला पैसे मिळा यला लागल्यानंतर पहिल्याप्रथम दहापंधरा रुपयांची थैलाभार साखर आणून टाकायची-चहाच्या पावडरीचं सबंध खोकंच्या खोकंच आणायचं आणि दुधासाठीं एखादी म्हैस आणायची- दादाजानला बरेंच दिवस

पुरतील एवढ्या विडया सिगारेटी अगदीं सबंधच्या सबंध आणून द्यायच्या— आणि स्वतःसाठीं भरपूर खाद्यपदार्थ विकत घ्यायचें...

दादीच्या आकस्मिक खेंकसण्यानें त्याची तंद्री भंग पावली. "खडा क्या रहा—मुंह देखते—जा सौदा लेके आ"— युसूफला हुकुमावर हुकूम सुटत होते. दिवसभर हें नाहींतर तें आणण्यासाठीं बापडयाला जावं लागे...तसा मग सकाळीं फूटपाथवर भेटलेला सखाराम त्याला आठवला. त्याला त्यानं खिजवलं होतं— थोडावेळ कां होईना, पण त्याला खूप त्रास होईल असं कांहींतरी केलं होतं. आपण गेल्या अनेक दिवसांपासून या म्हातारीची प्रत्येक आज्ञा बिनबोभाटपणें पार पाडत आहोंत, याची त्याला आठवण झाली. तसा मग त्यानें निश्चय केला कीं आपल्या या आयुष्यांत कांहींतरी महत्त्वाचा फेरफार व्हायला पाहिजे. आपण जर असाच घरांतील कामें करण्यांत वेळ घालवला तर अनेक गोष्टी आपणास मुळीं करतांच यावयाच्या नाहींत. शाळेच्या फाटकांत थांबायचं— रंगीबेरंगी पोरांच्या ओळखी करून घ्यायच्या—पेरूवाल्या बागवानाची कामें करून पेरू उकळायचा—मग थिएटरांत फिरून यायचं— काल संध्याकाळीं एका पोलीसाला चकवलं, त्याची कांहींतरी खोड आजहि काढायची. या सर्व गोष्टी व्यवस्थित व्हायलाच पाहिजेत... आपल्याला असं सामान्य आयुष्य घालवून उपयोगाचं नाहीं. त्यानं दादीकडे तोंड वेंगाडून बघितलं— "जा मै नहीं जाता—चुप मत पुकार!"— दादीनं चुलीजवळील चिमटा त्याच्या अंगावर भिरकावला. तो एकदम बाजूला सरल्यामुळें चिमटा दाणे टिपणाऱ्या कोंबडीला लागला. तिनें फडक् फडक् पंख फडकावले नि चमत्कारिक आवाज केला. तसा युसूफला आनंद झाला, आणि दादीला त्यानं आंगठा दाखवला. आपल्या मुलाच्या या खोडयांवर बुब्बु मनांतल्या मनांत खूप होऊन, कोपऱ्याकडे तोंड करून हंसावयास लागली. तशी मग म्हातारी दोघांवरहि संतापली आणि आपल्या झिजलेल्या शिव्या उच्चारावयास लागली.

सौदा न आणताच तो घराबाहेर पडला...

युसूफ पुन्हां रस्त्यावर आला. एव्हांना रस्ता माणसांनीं भरून गेला होता. युसूफला या दृश्याची मजा वाटली. प्रत्येकजण आपल्याच धांदलींत होता. तो शाळेच्या फाटकाजवळ येऊन पोंचला. रंगीबेरंगी पोरे गळ्यांत दप्तरें अडकवून इतस्ततः फिरत होतीं. युसूफ प्रत्येकाजवळ थोडावेळ थांबला. त्याच्या ओळखीच्या मुलांनीं आपल्या पुस्तकांतील चित्रें त्याला दोस्तान्यांत दाखवलीं. पुस्तकांतील एक अक्षरहि युसूफला वाचतां येत नव्हते तरी पण तीं चित्रें बघून त्याला आनंद होत होता. मग त्यानं आपल्या गळ्यांतील गलोल एका मुलाला थोडावेळ बघण्यासाठीं दिलं. त्या मुलाला कांहीं खडा मारतां येत नव्हता तसं युसूफनं गलोल आपल्या हातांत घेतलं— एक भला मोठा खडा त्यांत ठेवला नि रबर कानापर्यंत ओढून खडा रस्त्याच्या दुसऱ्या बाजूस भिरकावला...

आणि योगायोगाची गोष्ट म्हणजे सकाळी ज्या माणसाला युसूफनें चिडवलें होते त्यालाच तो खडा हॅटवर लागला! सखाराम कपडे करून आणि पदव्यांचे पुडकें हातांत घेऊन ऑफिसांच्या पायऱ्या झिजवण्यासाठीं निघाला होता. खडा टाळक्यांत बसल्यामुळें तो खूप चिडला, आजुबाजूच्या लोकांचेहि त्याच्याकडे लक्ष वेधलें गेलें होतें. सखारामची दृष्टि खडा मारणाऱ्या युसूफवर खिळली, आणि त्याला आठवलं कीं हें कार्टं आपणास सकाळींहि उगाचच खिजवून गेलं होतं. तशी त्याला वाटलं कीं तो मुलगा आपला निषेध करत आहे आणि आपल्याला कःपदार्थ समजत आहे... हा आपला अपमान आहे... पदवी मिळवूनहि नोकरी मिळत नाहीं— आपण या जगांत अगदींच मूर्ख ठरलों आहोंत ... कचेरींतलें लोकच नव्हे तर रस्त्यावरील पोरे सोरेहि आपली कुचेष्टा करतात. तो मनांतल्या मनांत कुणावर तरी परत चिडला— तोंडांतल्या तोंडांत कांहीं तरी पुटपुटला— आणि त्यानें चमत्कारिक हातवारें केलें...

बाजूनें जाणारी एक पोरगी त्याच्या या हालचालीकडे बघत होती. सखारामच्या हें ध्यानांत येतांच त्यानं झटकन् स्वतःला सांवरलं. ती पोरगी ओंठांतल्या ओंठांत त्याच्याकडे बघून हंसत होती. तसा सखाराम खूप वरमला–त्याला कसंसच झालं! ...

मग एकदम त्याला ते मुसलमान पोरगं आठवलं–त्याच्यापेक्षां सुखी आणि स्वतंत्र असलेलं! त्यानं सभोंताल त्याला धुंडाळण्याचा प्रयत्न केला पण युसूफ केव्हांच कुठल्याकुठें पसार झाला होता. एकाजागीं थांबण्यास तो कुणाचा बांधलेला थोडाच होता. आणि त्याला सवडतरी कुठें होती ?...

सखाराम ऑफिसचा विचार करत पुढें निघाला तेव्हां युसूफ एका थिएटराच्या आवारांत विड्या सिगारेटची थोटकं गोळा करत होता. तिथून तो बाहेरील शेंगावाल्यांच्या गाड्याजवळ येऊन घुटमळावयास लागला. गाडीवाल्यांचं आपल्याकडे लक्ष नाहीं असं पाहून एक मूठ त्यानं झटकन् खिशांत कोंबली अन् लोकांचं लक्ष जाण्याच्या आंत तिथूनहि धूम ठोकली. त्याला या साऱ्या गोष्टींनी हुरूप मिळत होता. त्याच्या जगण्यांत चैतन्य निर्माण होत होतं. तो मग कालच्या पोलीसाजवळ आला. आज कशाप्रकारें त्याची कुरापत काढावी या विषयीं बेत आंखूं लागला. त्या पोलीसाच्या मिशा उपटण्याची त्याची मनस्वी इच्छा होती. पण ती संधि मिळेल असं त्याला वाटत नव्हतं. मग त्यानं आपल्या गलोलांत खडा ठेवला अन् जोरांत पोलीसाच्या दिशेनें भिरकावला. तो खडा पोलीसच्या पाठींत बसला, आणि तो विव्हळला. त्याची नजर युसूफवर पडली आणि त्याला पकडण्यासाठीं तो जागेहून उठला. मग युसूफ तिथून पळत निघाला...पोलीस आपणांस पकडत आहे असं त्याला वाटलं. एवढ्यांतच समोरून आपली दादी येत आहे असा त्याला भास झाला... त्यानं गांगरून दुसऱ्या दिशेकडे बघितलं–सकाळीं ज्याला खडा

मारला तो सखाराम आपल्या पाठीमागें येत आहे व तो शेंगा विकणाराहि त्याच्या बरोबर आहे– सारं जग आपल्या विरुद्ध जबरदस्त कट रचावयास लागलं आहे असं त्याला वाटलं. युसूफला याची मजा वाटत होती. त्याचं एक मन या धाडसावर बेहद्द खूप होतं आणि दुसरं मन मात्र घाबरत होतं. या लोकांना कांहींतरी करून आपल्या वाटेंतून काढून टाकायला पाहिजे, याविषयीं तो विचार करावयास लागला. तो विचार करतच पळत होता– आणि दमल्यामुळें अचानक एका जागीं थांबला... तो त्याच्या घराजवळ येऊन पोंचला होता.

तो आतां एका विजेत्याच्या ऐटींत आपल्या घरांत शिरणार होता. सारे पराक्रम घरच्या माणसांना सांगणार होता– तेव्हां बी. कॉम्. झालेला सखाराम युसूफचा द्वेष करत नोकरीसाठीं वणवण भटकत होता–निराश होत होता...

एक चाक मोठें आणि एक लहान–अशा रथांत बसलेली सकाळ या दृश्याकडे बघून हंसत होती ! ...



## ११. बुल्डॉग

विश्वासराव मोठ्या रुबाबानें मार्ग आक्रमीत होते आणि रुबाबानेंच सर्व जगाकडे बघत होते. त्यांच्या पायांत फ्लेक्सचा करकर वाजणारा बूट होता आणि रस्त्यांत पडलेल्या एका छोट्याशा दगडाला त्यांनीं उगाचच ठोकरले. सिमेंटच्या गुळगुळीत सडकेवर तो सरपट गेला. पॅंटच्या खिशांत हात घालून त्यांनीं त्या सरपटत जाणाऱ्या दगडाकडे बघितले आणि मग त्यांना एकाएकीच वाटलें कीं दगडच काय-त्यांच्या मार्गांत आड येणाऱ्या प्रत्येक सजीव, निर्जीव वस्तूला त्यांनीं असेंच लाथाडलें असतें- नव्हे ते लाथाडीतच होते. त्यांचा चेहरा बुल्डॉगसारखा उगाचच क्रूर भासावयास लागला आणि दाट गवतांतून धांवणाऱ्या सापासारखे विचार त्यांच्या मनांतून पळावयास लागलें...

एक भिकारी आडवा आला नि गयावया करीत म्हणाला-"साहेब! गरीबाला एखादा पैसा द्या-देव तुमचं भलं करील-मी दोन दिवसांपासून उपाशी आहे.-"

विश्वासरावांनीं बुल्डॉगसारखें त्याच्याकडे बघितले, नि ते वसकन् धांवत म्हणाले-"चल हट्! धडधाकट असून भीक मागायला लाज नाहीं वाटत? ऐतखाऊ लेकाचे! म्हणे पैसा द्या-पैसा काय मोफत मिळतो?"

तो भिकारी त्यांच्या तुसडेपणाकडे दुर्लक्ष करून निघून गेला. अशा वृत्तीच्या माणसांशीं त्याचा नित्याचाच संबंध होता. पण विश्वासराव

मात्र अजूनहि तोच विचार घोळवीत होते. गुरें ज्याप्रमाणें रंवथ करतात त्याप्रमाणेंच बारिसारीक विचार घोळवीत बसण्याची त्यांना संवय होती. भिकेवर जगून दुबळं आयुष्य कंठण्याची माणसांना एक वाईट खोड आहे... आयुष्य कसें अगदीं धडाडीनें कंठलें पाहिजे... पैसा, पैसा म्हणजे आहे काय चीज? थोडेसें धीट बनलें कीं संपत्ति पायाशीं लोळण घेतें...

पैशाचा विचार येतांच त्यांनीं नकळतपणें स्वतःच्या भारी किंमतीच्या सुटाकडे बघितलें नि फ्लेक्सच्या बूटाकडेहि बघितलें–तो जास्तच करकर वाजवत ते चालावयास लागले...

रस्त्यावरील गर्दीतील एका माणसाचा त्यांना सहजच धक्का लागला. त्यानें "सॉरी"–म्हणून दीनपणें त्यांच्याकडे बघितले. यांत फारसें गंभीर असें कांहींच नव्हते. पण विश्वासरावांनीं आपल्या नेहमीच्या पद्धतीनें बुल्डॉगसारखा चेहरा करून त्या माणसाला गुग्गुरत म्हटलें–"रस्त्यानें जरा बघून चालत जा मिस्टर! माझ्या ऐवजीं एखाद्या बाईला धक्का लागला असता म्हणजे? ऑं!"–

त्या माणसाला विश्वासरावांची वागणूक चमत्कारिक वाटल्याखेरीज राहिली नाहीं. त्याच्या एकंदर सभ्यतेला विश्वासरावांनीं सुरूंग लावला होता. त्यानेंहि उत्तर दिलें–"अहो! पण मी दिलगिरी व्यक्त केली आहे. सॉरी– म्हटल्यानंतरहि तुम्ही उगीचच एका साध्या गोष्टीचा विपर्यास करत आहात–गर्दीत या गोष्टी चालायच्याच!"

विश्वासरावांच्या स्वभावाला खाद्य मिळालें. त्यांना प्रत्युत्तरें फारशी आवडत नसत. ते लाल निळे झाले. "नो अर्ग्युमेन्टस्! या गोष्टी चालायच्याच म्हणजे काय चेष्टा आहे? मवाल्यासारखे तुम्ही धक्के मारणार– आणि इंग्रजीचा दीड शब्द ऐकून आम्ही गप्प बसावें, म्हणून आम्हालाच परत उपदेश करणार? अरे! हें आहे काय?"–त्यांचा हा भांडखोर स्वभाव बघून, त्या माणसाला भारीच आश्चर्य वाटले. त्यानें

पड खाण्याचें ठरवलें आणि तो झपाट्यानें निघून जाण्याचा विचार करावयास लागला.

पण विश्वासरावांना समजण्याच्या आंतच त्यांच्या मनानें त्या माणसाशीं भांडण्याचा निश्चय करून टाकला होता. त्यांनीं त्याचें बखोट पकडले आणि ते फेंदरलेल्या आवाजांत म्हणावयास लागले– "कुठें पळताहात मिस्टर ? क्षमा मागितली म्हणजे कांहीं उपकार नाहीं केलें माझ्यावर ! तुम्हा लोकांना उगाचच धक्के मारत चालण्याची वाईट खोड आहे– दुबळीं माणसें तुम्हाला घाबरतात, पण मी त्या कोटींतला नाहीं. टोल्याला प्रतिटोला मी देत असतो–कळलें ?"

"हें पहा मिस्टर ! मला स्वतःला भांडण्याचा सोस नाहीं– सोडा मला– असल्या फालतू गोष्टीसाठीं वेळ नाहीं माझ्याजवळ"– तो माणूस त्यांच्या तावडींतून सुटका करून घेण्याची धडपड करीत म्हणाला.

"आणि भांडणाखेरीज मला कांहीं दुसरा उद्योग नाहीं– अशी तुमची समजूत आहे काय ? मोठे सभ्यच आहात कीं नाहीं !"

"एवढा वेळ मी कसें बसें सहन केलें– तुम्ही माझी सभ्यता काढतां आहात हें कांहीं बरें नाहीं हं– सांगून ठेवतो– मला जास्त ताणण्याचा प्रयत्न करूं नका"–

"अरे ! जा–मोठा आला आहे सभ्य ! तुझ्या या फडतूस धमकीची मी पत्रास बाळगील असं वाटलं का तुला ? तुझ्यासारखा छपन्न लोकांना वठणीवर आणण्याचं सामर्थ्य आहे माझ्यांत– काय समजलास ?"

मग एवढें भांडण पुरें आहे असा त्यांच्या मनानें कौल देतांच, त्यांनीं तो विषय तेवढ्यावरच सोडून दिला. इतरांची जिरवण्याचं आपलं उद्दिष्ट साध्य झालं कीं, विश्वासराव त्या गोष्टीचा पाठपुरावा सोडून देत असत. त्यांच्यांतील बुल्डॉग तृप्त झालेल्या बोक्याच्या ऐटींत मग पुनश्च खालीं मुंडी घालून चालावयास लागे...

विश्वासराव बारीक नजरेनें पुन्हां जगाकडे बघत चालावयास लागले.

कुठें कांहीं वाव आहे कां हें बघावयास लागले. प्रत्येकाला ठेंचण्यासाठीं ते उत्सुक असत. अशाप्रकारची संधि हातांतून जाऊं नये, याची ते काळजी घेत. इतरांचा वेळोवेळीं अपमान करणें, हें आपलें एक महत्त्वाचें कार्य आहे असें त्यांना वाटे. यासाठीं त्यांना नेहमीं बुल्डॉग सारखें क्रूर दिसावें लागे.

ते आपल्या या क्रूर चेहेऱ्यानिशींच घरीं पोंचले. दारांत खेळणारीं सुमा आणि नंदू हीं त्यांचीं मुलें त्यांना बघतांच खेळ अर्धवट सोडून भेदरलेल्या कबुतरासारखीं घराच्या आंतल्या भागांत पळालीं. त्यांच्या बूटाचा करकर आवाज दिवाणखान्यांत घुमतांच त्यांचा नोकर लटपटत धांवत आला. कोचावर त्यांनीं आपल्या अंगाचें मुटकुळें फेकून दिले होतें, तो नोकर त्यांच्या पायांतील बूट काढावयास लागला, फेकून दिलेलें कपडे गोळा करावयास लागला. घरांतली ही स्तब्धता त्यांना नवखी नव्हती. त्यांनींच शिस्तीच्या आहारीं जाऊन घराला असल्या-प्रकारचें वळण लावून दिलें होतें. सारे व्यवहार ओसाड गांवांतील शांततेनें चाललें होतें. पण एकाएकीच विश्वासरावांना कसला तरी झटका आला—त्यांनीं बूटाचें बंद सोडत असलेल्या नोकराकडे क्रूरपणें बघितले– 'राहूं दे– तें तसेंच ! शोभा कुठं गेली आहे ?' त्यांना एका-एकीच पत्नीची आठवण झाली. त्यांच्या नेहमीच्या शिस्तीनुसार ती थोडयाच वेळांत चहाचा ट्रे आणि खाद्यपदार्थ घेऊन स्वतः तिथें येणारच होती. तसें त्यांनीं तिला कटाक्षानें बजावलें होतें—बायकोनें स्वतः चहा घेऊन यावा–नोकरांकरवीं असलीं कामें करवून घेऊं नयेत, असें त्यांचें एक विक्षिप्त मत होतें. ती थोडयाच वेळांत या नियमानुसार तिथें येणार होती. पण आज त्यांना तिची आठवण झाली होती. नोकरानें चांचरत उत्तर दिलें– 'आंत आहेत बाईसाहेब–येतीलच एवढ्यांत चहा घेऊन'– या उत्तरानें त्यांचें समाधान व्हायला कांहींच हरकत नव्हती. परंतु आपण आज वाजवीपेक्षां जास्त अस्वस्थ

आहोंत, अशी त्यांची समजूत झाली होती. घरांत पाऊल ठेवतांच बायकोनें आपल्या भोंवतीं भोंवती असावयाला पाहिजे, असा एक नियम करून टाकायचा त्यांनीं निश्चय केला. इतक्यांतच त्यांची पत्नी चहाचा ट्रे घेऊन आली. तिचा चेहरा हंसरा होता आणि कपडे टापटीपीचें होते. विश्वासरावांनीं किंचित् रागाच्या दृष्टीनें तिच्याकडे बघितले व ते बडबडावयास लागले– "माणसांची काळजीच नाहीं कुणाला– आम्ही किती वेळपासून ओरडा करत आहोंत, नि तुम्ही मात्र गुपचुप आंत बसून राहता! नवरा म्हणजे चेष्टा वाटली की काय तुम्हाला? या असल्या गोष्टी आम्हाला मुळींच खपत नाहींत– समजलांत?"

"इश्श! पण आज झालं आहे काय स्वारीला एवढं गरम व्हायला? आम्हीं एक तुमचा आवडता खाद्यपदार्थ केला आहे– त्यामुळेंच थोडासा उशीर झाला–" शोभा 'संशय कल्लोळ' मधल्या रेवतीसारखी म्हणाली. या उत्तरानें तरी नवऱ्याचा रुसवा कमी होईल अशी तिची अपेक्षा होती.

"हें बघ शोभा– तुला जें काम करायचं असतं तें आम्ही परत येण्याच्या आंत उरकून टाकत जा– आम्ही थकून भागून घरीं येतों– अन् स्वागतासाठीं पुढें येतो तो नोकर! तुम्हाला आमची पर्वाच वाटत नाहीं– आम्ही दिवसभर मरमर करतो ती कुणासाठीं? घरीं येतांच मुलें आम्हाला घाबरून पळतात, तुम्ही आंत बसून राहता– अरे! ही काय वागण्याची रीत झाली!" त्यांच्या या लाडीक वागणूकीनें शोभाला किंचित् गुदगुल्या झाल्या. नवऱ्याचा असल्या प्रकारचा प्रेमळ राग प्रत्येक बायकोलाच हवाहवासा वाटत असतो. पण स्वतः विश्वास-रावांनींच या प्रकारांना हरताळ फासला होता. आपण एका करड्या शिस्तीचे भोक्ते आहोंत ही जाणीव त्यांनीं कुटुंबांतील एकदर मंड-ळीच्या अंगवळणी पाडली होती. तसें म्हटल्यास ते कांहीं मिलिटरींत

नोकरीला नव्हते पण जीवनांत त्यांनीं कुणास माहीत कां– शिस्तीला फार मोठें स्थान दिलें होते. सर्व गोष्टी मोजून मापून करण्याची त्यांना सवय होती. ते एका मोठ्या कन्सर्नचे मॅनेजर होते आणि व्यापारी दृष्टिकोनांतूनच सर्व जगाला किंबहुना साऱ्या जीवनमूल्यांना ते मोजीत असत. व्यवहारांत कसें वागावें, आणि पैसा कसा मिळवावा, याचा ते स्वतःला आदर्श समजत असत. लाचार आणि दुबळीं माणसें त्यांना मुळींच आवडत नसत. ते सहजासहजीं कुणाचाहि अपमान करत. उर्मटपणा त्यांच्या एकंदर वागणुकींत भरला होता...

संसारांतहि त्यांची वागणूक अशीच व्यापारी वृत्तीची होती. प्रेम देखील ते मोजून मापून करीत असत. इतर कुटुंबांतील मुलें फाजील लाडानें वाहवत जातात, यामुळें त्यांनीं आपल्या मुलांना नेहमीं एका विशिष्ट पद्धतीनें वागविलें होतें. त्यांची मुलें ते घरीं आले म्हणजे त्यांना भयंकर घाबरत. मांजराला बघून जसें उंदीर बिळांत दडतात, त्याप्रमाणें तीं घरांत कुठें तरी अदृश्य होत. आपल्या मुलांनीं आदरानें आपणास घाबरावें अशी त्यांची अपेक्षा होती. पण मुलांना त्यांची अपेक्षा समजूं शकत नव्हती. तीं बिचारीं अजाण बालकें होतीं. आपले बाबा म्हणजे कुणीतरी एक अत्यंत भयंकर व्यक्ति आहेत अशी त्यांनीं समजूत करून घेतली होती. त्यांना आई देखील घाबरते, तेव्हां आपणहि घाबरायलाच पाहिजे असें मुळीं त्यांनीं ठरवूनच टाकलें होतें...

विश्वासराव आज नेहमीपेक्षां मऊ कसें काय झाले आहेत, याचा त्यांच्या पत्नीला अचंबा वाटत होता. मग शोभानें 'सुमा-नंदा' अशी हांक मारून मुलांना बोलाविलें. तीं मुलें दबकत तिथें आलीं, नि आईला बिलगून उभीं राहिलीं. विश्वासरावांना आकस्मिकच प्रेमाचा दाट उमाळा आला. त्यांनीं नंदूचा पापा घेतला व सुमाच्या केंसावरून पाठीवरून प्रेमानें हात फिरविला. मुलांच्या अभ्यासाचीहि चौकशी

केली. आपलं सर्व कुटुंब आपण लावून दिलेल्या शिस्तीप्रमाणें चाल-ल्याचं बघून त्यांना समाधान वाटलं.

शोभानें त्यांचे आवडते बटाटेपोहे केले होते. सर्व मंडळी खाद्य-पदार्थांचा समाचार घ्यावयास लागलीं. तें सारें वातावरण मोठें प्रसन्न होतें. त्यानंतर सर्वांनीं चहा घेतला. विश्वासराव आज वाजवीपेक्षां जास्त आनंदी होतें, नि मग त्यांना एकाएकीच जाणवलें कीं आपण आपल्या विशिष्ट मर्यादेबाहेर जात आहोंत. आपली प्रेमळ वागणूक यापेक्षां जास्त दिसूं देण्यांत अर्थ नाहीं. ते आज मूडमध्यें आहेत हें बघून शोभा खालीं बघत हळूंच म्हणाली. "कितीतरी दिवसांपासून आपण सिनेमाच बघितला नाहीं– जावूंयात कां आज कुठेंतरी–" नवऱ्याबरोबर सिनेमाला जाणें म्हणजे एक मोठी चैन आहे अशी त्या बिचारीची निष्ठा होती. संसारांत यामुळेंहि एक आनंद निर्माण होतो अशी तिची समजूत होती...

विश्वासराव ज्या गोष्टीची अपेक्षा करीत होते, ती गोष्ट शेवटीं घडलीच होती. माणसांना जीवनांतला निरपेक्ष आनंद लुटतांच येत नाहीं, अशी जी त्यांची तक्रार होती, तिला पुष्कळशा प्रकारांनीं पाठिंबा मिळत होता. सर्वांची विचारपूस करण्यापलीकडे त्यांच्या आजच्या वागणुकीचा दुसरा उद्देश नव्हता... पण नवरा मूडमध्यें दिसतांच, बायका आपल्या मागण्या मांडत असतात– हें तत्त्व त्यांना पटत नव्हतें... तसें म्हटल्यास ते कांहीं म्हणतां कांहीं उणें पडूं देत नव्हते. प्रत्येकानें स्वतंत्रपणें जीवन जगावें– शक्यतों कुणावर अव-लंबून राहूं नये असें त्यांना वाटत असे. बायकोची इच्छा अत्यंत सामान्य होती. ती सहजासहजी पुरवितां येण्यासारखी होती...

पण त्यांच्यांतील बुल्डॉगला कसला तरी वास आला. एखादावेळ हंसत खिदळत चाललेलें संभाषण, अर्धी झालेली रेकॉर्ड एकदम बंद करावी तसें बंद पडलें.

"तुमच्या हातांत काय पैसे नसतात? सिनेमाला जायला मी कधीं बंदीं केली आहे काय? आणि पुष्कळ दिवस सिनेमा नाहीं बघितला म्हणजे माणसें कांहीं मरत नसतात! सारीं भिकार लक्षणें!" विश्वासराव फेंदारलेल्या आवाजांत किंचाळलें.

त्यांचा तो भयंकर अवतार बघतांच सुमा आणि नंदू पुन्हां पूर्वीसारखीं भेदरलीं. आपले बाबा म्हणजे कुणी तरी फारच भयंकर व्यक्ति आहेत, असा जो विचार त्यांच्या बालमनांत घर करून होता, त्याला पुष्टि मिळाली. मग शोभाच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. आपला फारच मोठा अपमान झाला आहे, या जाणिवेनें ती गरीब बाई खरोखरीच रडावयास लागली. त्यांनीं सौम्य शब्दांत नकार दिला असता आपण फार थकलों आहोंत असें सांगून सिनेमाचें टाळलें असतें तर तिनें हि मुळींच आग्रह केला नसता. उलट त्यांना सुख मिळावें यासाठींच तिनें धडपड केली असती...

शोभा आपल्या पतीला फारच जपत होती. त्यांचे साधें दुखलेंखुपलें तरी तिची कोण त्रेधा उडून जाई. त्यांच्या एकंदर लहरी ती सांभाळीत होती- शिस्तीच्या रुळावर संसाराचा गाडा हांकीत होती. परमेश्वराच्या कृपेनें कुठल्याच गोष्टीची कमी नव्हती. दोन सुदृढ मुलें-नवरा आणि संसार या परीघांत तिचें जीवन बंदिस्त होतें, आणि यासाठीं ती आपलं सर्वस्व समर्पित करीत होती. नवऱ्यावर तिचें फारच फार प्रेम होतें- अगदीं कंटाळा यावा एवढा ती आपल्या प्रेमाचा वर्षाव करत होती ... तिच्या स्त्रीहृदयाला यांतच कृतकृतार्थ झाल्याप्रमाणें वाटें...

साहजिकच नवऱ्याकडूनहि ती याच गोष्टींची अपेक्षा करीत होती. त्यांनीं कौतुकाचें चार शब्द काढावेंत- यासाठीं ती हपापलेली होती... परंतु कौतुक तर राहोंच-साधें औपचारिक वागणें सुद्धां विश्वासरावांना जमत नव्हतें. तिचें स्त्रीहृदय त्यांच्या वागणुकीनें नेहमीच जखमी

होत होतें...

...आपल्या नवऱ्याला साधी माणुसकी देखील नाहीं याची तिला खंत वाटली. इतरांना क्षुद्र समजण्याची त्यांना संवयच होती ! यामुळें दुसऱ्यांच्या भावनांना नेहमीं असेंच उत्तर मिळत असे...नसतीं दुःखें या प्रकारांनीं जीवनांत निर्माण व्हावयास लागलीं होतीं, आणि त्यांचीहि वाच्यता करतां येत नव्हती... बाह्य सुखाच्या आवरणांत त्यांचा संसार गुरफटलेला होता, आणि सुखहि दुःख बनलें होतें...

बायकोच्या डोळ्यांतील अश्रू बघून तर विश्वासराव जास्तच खवळले. एवढसं कांहीं बोललं कीं हीं माणसें कशी काय रडूं शकतात, याचें त्यांना आश्चर्य वाटायचें. तसें बघितल्यास ते कांहीं रागावले नव्हते. त्यांना सद्भावनेनेंच हें सांगायचें होतें कीं त्यांनीं आपणहून इतरांना किती तरी हक्क दिले आहेत. दिलेल्या स्वातंत्र्याचा प्रत्येकानें उपभोग घ्यावा... पण कुठली गोष्ट सरळपणें होईल तर शपथ ! ... यामुळें त्यांच्या चिडखोरपणांत भर पडत असे. भोंवतालचीं माणसें आपणास सहेतुक छळत असतात, अशी त्यांची समजूत व्हायची. कुणाचें छळणें ते सहन करूं शकत नव्हते. काय म्हणून त्यांनीं सहन करावें ?... तसें मग त्यांनीं डोळे गरगर फिरविले आणि चिडचिड्या आवाजांत ते म्हणाले– "एवढ्याशा गोष्टीला नकार दिला, तर सुरू झाली रडारड !... मला हें मुळींच आवडत नाहीं– चालत्या व्हा माझ्या समोरून– माझ्याच नशीबीं सुख नाहीं त्याला कोण काय करणार ? तुझ्यासारख्या बावळटाबरोबर गांठ पडली– भोगावीं आपल्या कर्मांचीं फळं– कुणावर उपकार थोडेच आहेत ?–"

तशी शोभाहि खवळली, तिच्या सहनशीलपणाचा विश्वासरावांनीं अगदींच अंत बघितला होता. ती जास्तच स्फुंदावयास लागली, आणि रडक्या आवाजांत म्हणाली–"मीच मेली वाईट आहे. सिनेमाची गोष्ट काढली नसती तर कशाला एवढी पाळी आली असती !"–या

शब्दांबरोबर तिचें रडणेंहि वाढलें.

थोडयावेळापूर्वीच्या प्रसन्न वातावरणाचा शेवट या रडारडीनें झाला. तिथें पुन्हां शांततेचें साम्राज्य पसरलें. विश्वासराव अगदीं उद्विग्न झाले, डोकें शांत करावयासाठीं म्हणून ते पुन्हां कपडे करून घराबाहेर पडले. आपल्या आयुष्यांत असे प्रसंग कां येतात, याचा ते विचार करावयास लागले...आपली वागणूक जगापेक्षां कांहीं निराळी आहे काय– असा त्यांना प्रश्न पडला...ते ज्या कन्सर्नमध्यें नोकरीला होते, तिथले हाताखालचे नोकर त्यांना घाबरत होते– घरांतील मंडळी त्यांना भीत होती– जणुं कांहीं ते राक्षसच होते!...रस्त्यानें देखील धडपणें चालण्याची पंचाईत होती. उगीचच कुणीतरी भांडण उकरून काढी, आणि तो मात्र व्यवस्थितपणें यांतून पळून जात असे...अडकत असत ते बिचारे विश्वासराव!...ते समर्थन करण्याचा प्रयत्न करीत, पण कुणी त्यांचें ऐकून घेईल तेव्हां ना!...यामुळें इतर लोकांत ते भांडकुदळ आणि उद्धट म्हणून नांवाजले होते. हाताखालील लोकांचें खालच्या आवाजांत चालणारें बोलणें त्यांनीं अनेकवार ऐकलें होतें. आपल्या साहेबांचें डोकें अंमळ बिघडलें असावें असें त्या लोकांचें मत होतें. ते सर्वांशीं चोखपणें वागत– सर्व बाबतींत योग्य ती काळजी घेत. पण कुठें काय बिघडत होतें कुणास माहीत–प्रत्येक गोष्ट त्यांच्या मनाविरुद्ध व्हायची.

विश्वासरावांचा अजून एक विशेष म्हणजे त्यांच्या मनानें कोणती गोष्ट एकदां ठरवून टाकली म्हणजे मग त्यांत सहसा बदल होत नसे. त्यांचा निर्णय म्हणजे दगडावरील रेघ होऊन जायचा. व्यापारांत अनेक लप्पाडप्या कराव्या लागत असतात– त्यांच्या इथली काम करणारी मंडळी या दृष्टीनें त्यांना सल्ला देण्याचा प्रयत्न करायची, पण भानगडीच्या गोष्टींस त्यांचा विरोध असायचा. त्यांच्या या चमत्कारिकपणामुळें त्यांच्या कन्सर्नचें पुष्कळसें नुकसान झालें होतें आणि वरिष्ठाकडून त्यांना तंबीहि मिळाली होती. पण आपल्या विशिष्ट धोरणासाठीं

ते वाटेल ती किंमत आनंदानें देत असत. यांत जगाच्या बापाचा चव्वलहि खर्च होत नव्हता...

ते आपल्या या धोरणामुळें इतरांशीं फटकून वागत होते, परंतु त्यांची भूमिका कुणीच समजून घेत नसे याचें त्यांना भारी वैषम्य वाटे. लोक त्यांना उलटून बोलत, त्यांच्यांतील संतापावर तेल ओतत– मग साहजिकच भडका उडे. ते कुणालाहि फाडफाड बोलत, अंगावर धांवून जात, ऑफिसच्या बाहेर घालवत...त्यांना कांहीं दिवसांनीं वेड लागणार आहे असं लोक म्हणावयास लागले होते...

हे विचार त्यांच्या मनांत आले आणि भोंवतालच्या लोकांविषयीं पुन्हां तिरस्कार जागृत झाला. त्यांना असें वाटलें कीं रस्त्यावर लोक आपल्याविषयींच कुजबुजत आहेत– आपल्याकडे बोटें दाखवीत आहेत, आणि फिदीफिदि हसत आहेत... ते लाल निळे झाले. असल्या प्रकारची कुचेष्टा त्यांच्या वांट्याला कां येत होती ?... त्यांच्यांतील बुलडॉग उसळला, व त्यांचा चेहरा क्रूर बनला. त्यांनीं आपल्या मागून येणाऱ्या एका माणसाकडे मोर्चा वळवला. तो आपला मुकाट्यानें खालीं बघून चालला होता, पण विश्वासरावांनीं एकाएकीच त्याचें बखोट पकडलें– " निर्लज्ज माणसा ! आतां काय कुजबुजत होतास. मी ऐकत नव्हतों असें वाटलें का तुला ?" त्यांनीं हात वाऱ्यांत फिरवीत विचारलें.

तो माणूस प्रारंभीं भेदरून जाऊन त-त-प करावयास लागला.त्यांच्या या आकस्मिक हल्लयानें तो भांबावून गेला होता, पण थोडयाच वेळांत त्यानें स्वतःला सांवरलें. आणि हिसडयासरशीं विश्वासरावचा हात आपल्या शरीरापासून दूर झिडकारला–"तोंड सांभाळून बोला मिस्टर ! डोकें वगैरे फिरलें आहे याय ?" त्यानें उसळून प्रश्न विचारला, व त्यामुळें आजूबाजूच्या लोकांचें तिकडे लक्ष गेलें. मेलेल्या जनावरा-भोंवतीं ज्याप्रमाणें गिधाडें जमतात, त्याप्रमाणें तिथें गर्दी जमली.

प्रत्येकजण "काय झालें?" म्हणून पृच्छा करावयास लागला. विश्वासराव प्रयत्नपूर्वक सांगावयास लागले कीं हा माणूस त्यांना उगीचच 'वेडा' म्हणून संबोधीत होता. परंतु तो माणूसहि तेवढ्याच अट्टाहासानें आपण कांहींच बोललों नाहीं असें सांगत होता.

विश्वासराव आपल्या जिवाची आटापीट करीत होते. परंतु त्यांचें कुणी ऐकतच नव्हते. प्रत्येकजण आपआपसांत त्यांचे डोकें बिघडलेलें आहे अशाप्रकारचा अभिनय करीत होता. तो माणूस त्यांना खूप टाकून बोलत होता. आणि विश्वासरावहि त्याला शिव्या देत होते. लोकांची फुकटांत करमणूक व्हावयास लागली... एवढ्यांतच गर्दी जमल्यामुळें पोलीसची स्वारी तिथें डुलत डुलत यावयास लागली, आणि त्याला बघतांच गर्दी ओसरावयास लागली.

तो माणूसहि तिथून सटकण्याच्या बेतांत होता. जातां जातां तो म्हणाला–"तुम्ही त्या कुठल्याशा कन्सर्नचे मॅनजर आहांत हें मला माहीत आहे. तुमचा स्वभाव भांडखोर आहे, हें सुद्धां मी ऐकून आहे. माणसाला थोडे बरे दिवस आले म्हणजे तो असाच गर्वानें आंधळा होत असतो. तुमच्या हाताखालचे लोक आणि घरांतलीं माणसें तुमचं ऐकून घेत असतील–परंतु चारलोकांत राहयचं म्हणजे जरा जबाबदारीनें वागायला पाहिजे– जरा काळजीपूर्वक वागत जा, समजलात? तुम्ही पूर्वीचें आयुष्य विसरलात वाटतं?–"

एवढं बोलून तो दूर गेला. परंतु त्याचे शब्द मात्र विश्वासरावांना अतिशय झोंबले. ते किती तरी वेळ त्याच्या वाक्याचा विचार करावयास लागले. तो माणूस अजून थोडा वेळ तिथें थांबला असता तर त्यांनीं त्याला भरपूर सुनावलें असतें.

पण लोक त्यांच्याशीं पूर्णपणें भांडत देखील नव्हते. त्यांचा संताप अजून एक डिग्रीनें वाढला. आणि जवळपास भांडण करण्यास कुणीच माणूस सांपडेना त्यामुळें त्यांचा भयंकर कोंडमारा व्हावयास लागला.

शेवटीं ते मनांतल्या मनांत सबंध जगाला शिव्या बहाल करावयास लागले. त्यांच्या ओठांची हालचाल व्हावयास लागली, आणि हात यंत्राच्या बाहुलीप्रमाणें इकडे तिकडे फिरावयास लागले... हंसण्याचे आवाज मात्र सतत उसळत होते...

मग जगाच्या रागांतून त्यांनीं आपलें डोकें किंचित् वर काढलें, व त्यांना स्वतःचाच सपाटून राग आला. आपण या लोकांच्या नादीं लागतों ही एक आपली भयंकर चूक आहे याची त्यांना जाणीव झाली. इतरांना वळण लावण्याचा त्यांचा उद्देश असे– परंतु तो फसत असे– आणि प्रत्येक गोष्ट त्यांच्या अंगलट येत असे. या प्रकरणांतून त्रासदायक घटना जन्म घेत होत्या... यांत त्यांचा काय दोष होता ?

ते अंतर्मुख होऊन स्वतःसंबंधीं विचार करावयास लागले. आपण असे कां वागतो, व त्याचें मूळ कुठें आहे, याचा त्यांना शोध करावासा वाटला. तशी त्यांना याचीहि आठवण झाली कीं मघाशीं ज्या माणसाबरोबर आपण भांडलों त्यानेंहि आपल्याला पूर्वीचें आयुष्य विसरला आहात काय म्हणून प्रश्न केला होता. आपल्या भूतकाळाशीं या गोष्टींचा कसा काय संबंध होता ? ...

मग त्यांचा जीवनपट डोळ्यापुढून सरकावयास लागला. त्यांच्या आजच्या सुस्थितीच्या आयुष्याच्या मागें एक दीर्घ तपश्चर्या होती. ते अनेक दिव्यांतून बाहेर पडले होते. अत्यंत दारिद्र्यांत त्यांचें बाळपण गेलें होतें. त्या विपन्नावस्थेंत विद्यार्जनासाठीं त्यांना फार हाल सहन करावें लागले होते. अनाथ विद्यार्थीगृहांत राहून त्यांनीं ज्ञान संपादन केलें होते. भोंवतालच्या शिष्ट समाजानें त्यांची कुचंबणा केली होती, आणि पाय ओढण्याचा प्रयत्न केला होता. परंतु त्यांनीं या सर्वांवर मात केली होती– जगांत कष्ट केल्याखेरीज मोठें होतां येत नाहीं असा त्यांचा अनुभव होता. त्यांना धीर देणारें कुणी मायेचें माणुस नव्हतें– तसल्या काळांत त्यांनीं मोठ्या निकरानें परिस्थितीशीं झुंज दिली होती.

त्या दुःख भोगलेल्या झाडाला सुखाची फळें आलीं होती... त्याचें जीवन अंतर्बाह्य बदललें होते...

त्यांना मिळालेलें हें सुख लोकांच्या डोळयांत खुपत असेल, अशी त्यांची समजूत होती. कुणी कांहीं उणें अधिक बोललें म्हणजे ते ताबडतोब त्याला तिथल्या तिथें ठेंचींत असत- आतां ते अपमान सहनच करूं शकत नव्हते. यासाठीं योग्य ती खबरदारी घेण्याच्या भरांत ते दुसऱ्यांचा अपमान करावयास लागले होते. ही संवय त्यांच्या हाडींमांसीं हळूहळूं भिनली होती...

पुष्कळ लोकांना त्यांचें हें वागणें मुळींच पसंत नव्हते साहजिकच तेहि विश्वासरावाशीं तसल्याच कुत्सितपणें बोलत असत. या गोष्टी पराकोटीला पोंचत होत्या, त्या आतां थांबविणें आवश्यक होते. यामुळें विश्वासरावांना भलतेंच अस्वस्थ वाटत होतें.

यांतून त्यांना मार्ग काढावयाचा होता. सर्वांना सुख मिळेल असें कांहीं करण्याची त्यांची मनस्वी इच्छा होती. त्यांच्या एका मनानें सांगितलें-"चार लोकांसारखा वागत जा- उगीचच तुसडा बनूं नकोस याचा कांहीं उपयोग तरी आहे कां? साध्या सुध्या गोष्टीसाठीं दुसऱ्यांचीं मनें दुखविणें चागलें नाहीं -"

दुसरें मन म्हणालें-"या चार लोकांनींच तुला अत्यंत छळलें आहे, त्यांचा तूं पुरेपूर सूड उगवायलाच पाहिजे-प्रतिकूल परिस्थितींत कुणी तुझ्याबरोबर नव्हते-"

"लोकांजवळ तुझी कांहीं किंमत राहणार नाहीं- असेंच वागलास तर एक दिवस नोकरीवरून हकालपट्टी होईल-"

"घाबरूं नकोस! भ्यालास तर सर्वनाश जवळ येऊन ठेपेल-"

त्यांच्या एका विचाराला दुसरा विचार टांग मारीत होता-तिथेंच तोंड ठेंचीत होता. विश्वासराव स्वतःचाच अपमान करावयास लागले होते-आणि त्यांचा चेहरा बुल्डॉगसारखा झाला होता!

* * *

## १२. वेडा

साडेनवाचा टोल पडतांच मधुकरची नेहमीची तारांबळ उडाली. त्यानें लगबगीनें जेवण उरकलें. दहा-पांचच्या लोकलची शिट्टी त्याच्या कानांना ऐकावयास येत होती. तशी लगबग वाढत होती.– धांदलीचें मांजर उगाचच इकडून तिकडे पायांत घोटाळत होते. अंगांत कोट चढवतांना तो कितीतरी दिवसांपासून परिटाला द्यावयाचा राहून गेला आहे याची त्याला जाणीव झाली. या कोटाला एक नवीन जोडीदार आणण्याची आवश्यकता होती– परंतु प्रत्येक ठिकाणीं कातर लावावी लागत होती...

पायांत सँडल्स अडकवितांना परत असल्याच एका आवश्यकतेचा उंदीर सुळकन् पळाला. सँडल्सचे पट्टे तुटलें होतें– पॉलिश उडून गेलं होतं आणि म्हणून ती कशी तरीच दिसत होती. लाचार आणि दुबळी. नवीन चप्पल लौकरच खरेदी करावी लागणार हा विचार मधुकरच्या मनांत आला, आणि त्याबरोबरच त्याला याचेंहि आश्चर्य वाटलें कीं त्याचे कपडे, सँडल्स या वस्तु एवढया लौकर कशा काय खराब होतात?

तो कसाबसा घराबाहेर पडणार तोंच– भिंतीवर टांगलेला फोटो त्याच्याकडे बघून केवढ्यांदा तरी हंसला. मधुकरनें दचकून वर बघितलें तेव्हां त्याला समजलें कीं त्याचा स्वतःचाच फोटो त्याला हंसत आहे. त्या फोटोंतला मधुकर एक अक्कडबाज तरुण मनुष्य वाटत होता.

कॉनव्होकेशनच्या संध्याकाळीं त्यानें हा फोटो काढवला होता. अंगावर गाऊन होता, हातांत पदवीचें पुडकें होतें- कडक परिटघडीचें कपडे अंगांत होते- आणि फोटोंतल्या त्या मधुकरमध्यें बेफिकिरपणाची एक आगळीच चमक होती...

दोन वर्षांपूर्वीचा मधुकर असा होता, याचें त्याला नवल वाटत होते. आणि आजचा मधुकर एवढा दुबळा असावा याचें वाईट वाटत होते. त्या मधुकरला असले मळकट कपडे आवडत नव्हते. त्यानें कधीं तुटलेल्या सँडलस् वापरल्या नव्हत्या. त्या मधुकरला दहा-पांचची लोकल पकडण्यासाठीं जिवाची आटापीट करावी लागली नव्हती. त्या मधुकरचें विश्व अगदींच स्वतंत्र होते. मौजेचें आणि आनंदाचें. अवघ्या दोन अडीच वर्षांत एवढा बदल व्हावा हें त्याला पटत नव्हते. सहन होत नव्हते. तसा मग मधुकरनें निश्चय केला कीं या महिन्यांत चार पांच उंची सूटस् शिवून घ्यायचें-सँडलसला रजा देवून टाकायची आणि कॉलेजला असतांना आपण जसें राहत होतों अगदीं तसलें जीवन जगायचें. निष्काळजीपणाचें- बेफिकिरपणाचें अकडबाज !

त्याला एकदमच ठसका आला, आणि म्हणून तो खोकावयास लागला. त्याच्या खोकण्यानें सुमित्रा आपल्या ओंच्याना हात पुसत बाहेर आली, आणि तिनें पाण्याचें भांडे त्याच्या हांतत दिलें. मधुकर उभ्यानेंच ढसढसा पाणी प्याला. मग सुमित्रानें सुपारीचें खांड त्याच्या हातावर ठेवलें, त्याच्या धांदलीचें सुमित्रेला हंसु आलें- परंतु मधुकरला असें वाटलें कीं ती आपल्यालाच हंसत आहे. तो शंकाखोरपणें तिच्याकडे बघावयास लागला, तो जास्तच वेंधळा दिसावयास लागला. तशी सुमित्रा म्हणाली, "कोट काढून टाका घरीं- मी धुवून देईन- कसातरीच घाणेरडा दिसतोय्-"

ती अगदीं सहजगतच असं म्हणाली-मधुकरला मात्र असें वाटलें की, ती देखील आपल्या या स्थितीवर मुद्दामच हंसत आहे. ती आप-

ल्या चिडवीत आहे... "कांहीं नको धुनायला सध्यांच–" एवढेंच तो तुटकपणें म्हणाला.

त्याच्या या तुटक वागणुकीचा सुमित्राला अचंबा वाटला. मधुकरचा स्वभाव पूर्वी असा चिडखोर नव्हता. त्याच्यामध्यें झपाट्यानें कांहीं तरी बदल होत चालला होता. त्याच्या अधुनमधून चिडण्यांतून आणि तुसडेपणांतून तो व्यक्त व्हावयास लागला होता. जीवनांतल्या साध्या-सुध्याच गोष्टीं, त्यांनींहि मधुकर त्रस्त व्हावयास लागला होता. कुठल्या तरी भीतीनें दडपल्यासारखें त्याचें एकंदर व्यवहार चाललें होतें. तो स्वतःशीच कुढत होता. त्याचा स्वभाव मागें कितीतरी बडबड्या होता. परंतु आजकाल तो तिच्याबरोबर फारसें बोलत नव्हता. घरीं दारीं सर्वत्र त्याची वागणूक बदलत चालली होती...

तिनें मग एका निश्चयानें त्याच्या कोटाची बाही पकडली. तसा मधुकर भेदरून गेला. अंग भिजलेल्या पांखरासारखा त्याचा चेहरा बनला. सुमित्रा म्हणाली," असं रे काय करतोस मधू ! वेडयासारखं–"

कितीतरी दिवसानंतर मधुकरच्या कानांवर तिचें हें शब्द पडलें. लग्नाच्या अगोदर आणि नंतर कांहीं दिवसपर्यंत ती त्याला अरे-तुरे म्हणत असे. पण पुढें जसजसें प्रौढत्व अंगीं बनावयास लागलें, तस-तसा दुरावा उत्पन्न व्हावयास लागला होता. आयुष्याच्या फिकेपणाचा प्रत्यय यावयास लागला– आणि रूक्षतेच्या झळा बसावयास लागल्या. ज्या हलुवारपणाच्या जाणिवेनें तीं एकत्र आलीं होतीं तेवढ्याच हलु-वारपणें लग्नानंतर एकमेकापासून दूर दूर जात होतीं. असें कांहीं घडेल अशीं दोघांनाहि कल्पना नव्हती.

"कांहीं नाहीं सुमित्रा– कुठाय् काय ?" मधुकरनें त्रावरून तिलाच उलट प्रश्न केला. तिच्याकडे बघण्यास तो घाबरत होता, म्हणून त्यानें आपली नजर घड्याळाकडें वळवली. दहा वाजायला दहाच मिनिटें उरलीं होतीं. तिच्या हातांतून आपला हात सोडवून घेण्याची त्यानें

खटपट केली. 'ऑफिसची वेळ झाली आहे' अशा प्रकारचे शब्द स्वतःशीच उच्चारले. परंतु एवढ्या सहजासहजीं सुमित्रानें त्याला निसटूं दिलें नाहीं.

"तूं आजकाल असा कां वागायला लागला आहेस?" तिने करारी-पणानें प्रश्न विचारला.

"अग! पण असा म्हणजे कसा?"

"तूं आजकाल बोलत नाहींस– ऑफिसांतल्या गंमती सांगत नाहींस– सारखा चिडत असतोस. माझ्याकडून कांहीं चुकतं कां?"

"भलतंच कांहींतरी! मी कधीं म्हटलं आहे असं?"

"म्हणायलाच कशाला हवं– दिसत नाहींत वाटतं साऱ्या गोष्टी!"

सुमित्राच्या डोळयांत पाणी सांकळलें होतें. ती आर्जवी नजरेनं त्याच्याकडे बघत होती. मधुकरला तिची कींव वाटली आणि स्वतःचाच त्याला राग आला. तिचा आक्षेप बरोबर होता. त्याची वागणूक बदलत चालली होती हे त्याला स्वतःला सुद्धां जाणवत होते. त्याला नकळत तो रूक्ष बनत चालला होता...

पुन्हां तो फोटोंतला अक्कडबाज मधुकर त्याला हंसला. तो आपल्या रूक्षपणावर हंसत आहे, असा त्याला भास झाला. ज्या गोष्टीं आज त्याला भेडसावण्यास समर्थ होत्या, त्यांना पूर्वी तो घाबरत नव्हता. त्याच्या कॉलेज जीवनासारखेंच पुढील आयुष्यहि खेळकरपणें जाईल अशी त्याची निष्ठा होती. परंतु प्राप्त परिस्थिति अशी कांहीं विचित्र होती कीं साध्यासुध्या गोष्टींनीहि तो भांबावून जावयास लागला. अगदीं सुमित्राची स्वतःच्या पत्नीची आणि लग्नाआधीच्या प्रेयसीची त्याला भीति वाटत होती, आणि तरीहि ती इतरांना कळूं नये अशीहि त्याची वेडी इच्छा होती. ती लपविण्याचा तो प्रयत्न करीत होता– परंतु ती लपवली जावूं शकत नव्हती. एवढें दिवस गप्प बसलेल्या सुमित्रानें आज त्याचा हात पकडून त्याला विचारलें होते–'तूं असा कां वागायला लागला आहेस?'

या प्रश्नाचें उत्तर देणें आवश्यक होतें. परंतु तसला कबुली जबाब देणें त्याच्या जिवावर येत होतें. त्याला स्वतःची लाज वाटत होती. त्याच्या स्वाभिमान दुखावला जात होता. त्या फोटोंतल्या मधुकरमधला अक्कडबाजपणा कांहीं अंशीं अजून शिल्लक होता. तो त्याला तसें करूं देत नव्हता. तो यांतून पळवाटा धुंडून काढण्याचा प्रयत्न करत होता– त्याची वृत्ती तुसडी बनत चालली होती. दुबळ्या अहंकाराच्या कात्रींत तो सांपडला होता...

ज्या गोष्टीमुळें जीवनांत सुखाच्या अमाप क्षणांची पखरण होणार असा विश्वास वाटला होता, तो हळुहळूं निवळत चालला होता. कॉलेजला असताना जीं स्वप्नें रंगवण्यांत आनंद वाटला होता, आणि त्यांच्या पूर्ततेची खात्री वाटली होती–ती फोल ठरूं बघत होती. कुठें तरी चुकत असल्याची, फसत असल्याची खंत निर्माण व्हावयास लागली होती. वृत्तींत नैराश्य धुडगूस घालूं बघत होतें. अपेक्षांना अगाणित चुरळया पडल्या होत्या. अंगावरल्या कोटासारख्या. तडजोडीचा एक अव्याहत लढा सुरूं झाला होता. परंतु तो बोचत होता. तो वृत्तीशीं सुसंगत नव्हता...

मधुकरला असें वाटत होतें कीं, आपण सुमित्राची जबरदस्त फसवणूक केली आहे. प्रेमाच्या जाळयांत आधीं तिला पकडलें आहे. तिला पुष्कळशा भुलावण्या दिल्या आहेत–ती भाबडेपणानें या अमिषांना बळी पडली आहे. त्या काळांतली एकहि गोष्ट त्याला करतां आली नव्हती. प्रत्येक ठिकाणीं ठिगळें लावावी लागत होतीं. सुमित्रा कधींतरी या गोष्टींचा उल्लेख करून आपला पाणउतारा करते कीं काय, अशी त्याला भीति वाटत होती– तसें कांहीं झालें असतें तर त्याला मेल्याहून मेल्यासारखें होणार होते. तिला तशी संधि देवूं नये, अशी त्याची दुबळी इच्छा होती. म्हणून त्यानें मौनाचा मार्ग अवलंबिला होता.

"मधुकर– तुला कशाची तरी भीति वाटत आहे– सांग ना तूं

कुठल्या गोष्टीला घाबरतोस तें ?" सुमित्रा आपल्या नेहमीच्याच भाबडेपणानें त्याला विचारत होती. जशीं ती कुठलीहि गोष्ट त्याला लग्नाच्या आधीं विचारीत असे.

मधुकरला विचार पडला होता कीं आपण तिला आपल्या मनांतल्या डाचणाऱ्या गोष्टी सांगून टाकल्या तर तिला काय वाटेल? आधींच आपण तिची फसवणूक केली आहे– तिला आपण भीत आहोंत हें तो कसें काय सांगू शकत होता ?

एवढ्यांतच आंतल्या खोलींत झोंपलेलें त्याचें एक वर्षाचें मूल जागें झालें. आणि तें रडावयास लागलें. सुमित्रा लगबगीनें आंत जावयास लागली. "ऑफिसांतून परत येशील तेव्हां सर्व गोष्टी सांगायच्या बरें कां ?" असें म्हणत तिनें हंसऱ्या चेहऱ्यानें त्याला निरोप दिला.

मग मधुकरहि रस्त्यावर आला. एकदाची आपली सुटका झाली. असें त्याला वाटलें आणि वाईटहि वाटलें. सुमित्रापासून सुटका होण्यासाठीं आपली धडपड चालवी हे त्याला आवडलें नाहीं. ज्या सुमित्रेवर आपण मनस्वी प्रेम केलें– जिच्याबरोबर लग्न करतांना जीवनांतील आनंदाच्या परमोच्च क्षणाचा साक्षात्कार घडला आहे असें वाटलें होतें– जिनें त्याचा संसार थाटला होता– जी त्याच्या मुलाची आई बनली होती– आणि जी कुठल्याच गोष्टीसंबंधीं साधी कुरबूरहि करत नव्हती तर उलट जास्त समजूतदारपणा दाखवत होती– त्याला पूर्वीच्याच हळुवारपणानें जपत होती– तिला आपण घाबरावें आणि फसवावें– याची त्याला लाज वाटत होती. त्याला स्वतःचाच तिरस्कार वाटत होता... ज्या परिस्थितीमुळें ही वेळ त्याच्या जीवनांत आली होती तिच्यावर तो दांत ओठ खात होता...

तो जेव्हां स्टेशनवर पोंचला तेव्हां दहा–पांचची लोकल तिथें नुकतीच येवून थडकली होती. जीवनाच्या या रेटारेटीचा आणि गर्दीचा त्याला उबग येत होता. याच गोष्टींनीं आपल्या आकांक्षा हिरा-

वल्या आहेत आणि आपणास कःपदार्थ करून टाकलें आहे- हें आज त्याला जाणवावयास लागलें. ..

या रेटारेटीपासून आणि गर्दीपासून कुठें तरी पळावें, आणि एकांतांत बसून गतजीवनाच्या नुसत्या आठवणीं घोळाव्यात- अशीं त्याची इच्छा होती. ज्या एका विशिष्ट चाकोरींतून ही लोकल माणसांची ने आण करत होती- ती चाकोरी आज त्याला बोचत होती. त्या मर्यादित चाकोरीनें त्याच्या विशाल स्वप्नांना गुळगुळीत नाण्यासारखें करून टाकलें होतें. व्यवहाराच्या बाजारांत तीं नाणीं चालत नव्हतीं आणि तरीहि प्रत्येकाच्या खिशांत हीच नाणीं भरलीं होतीं, आणि माणसें समाधानानें जीवन कंठीत होतीं. आपल्याच ऐटींत दंग होतीं.

"काय बाबूराव- तुम्हाला प्रोमोशन मिळालं आहे म्हणें- मग आतां एखादी पार्टी व्हायला पाहिजे बुवा!" एका वयस्क कारकुनानें तरण्या बाबुरावाच्या पाठींत थाप मारत हक्काची मागणी केली, आणि बाबुरावालाहि आपण एव्हरेस्ट शिखरावर चढल्यासारखें वाटलें. डब्यांतील इतर माणसांकडे बघून तो हंसत हंसत म्हणत होता- "वा पार्टी नाहीं देणार म्हणजे काय? तुम्ही लोक थोडेंच सोडणार आहांत!"

उष्टीं हाडकें चघळावीत- तशा या गप्पा मधुकरला वाटत होत्या. पूर्वी या गोष्टी कानांना मोठ्या गोड भासत होत्या- पण जीवनाच्या विस्तृत परिघांत या किती कवडी किंमतीच्या आहेत- याची जाणीव मधुकरला होत होती. ५५–३०–१३५ या भोंवतीं जीवनाची लोकल गाडी धांवत होती. दोनचार रुपड्यांची वाढ झाली म्हणजे कितीतरी दूरचा पल्ला गाठला आहे, या हिशेबांत माणसें बोलत होतीं. हीं माणसें या गोष्टी कशा काय सहन करूं शकतात याचें मधुकरला आश्चर्य वाटत होतें...

एका लेडी क्लर्कच्या जॉर्जेटच्या पातळाबद्दलहि याच पातळीवरून चर्चा चालली होती. ऑफिसांतून या बायका राजरोसपणें कसा धंदा

करत असतात या विषयावर माणसें बोलत होतीं, डोळे मिचकावून एकमेकाला आपापले अनुभव सांगत होतीं– आणि कांहींजण आपण मात्र तसले धंदे करणाऱ्यापैकीं नसून अगदींच पवित्र आहोंत– हें जिवाचा आटापिटा करून आवर्जून सांगत होतीं... सुखाच्या शोधासाठीं सर्वजण एक गटार उपशीत होते– परंतु तें मात्र त्यांना सांपडत नव्हते– तें मुळीं तिथें नव्हतेच !

आपणहि त्याच्या शोधांत गेल्या कांहीं दिवसांपासून चांचपडत फिरत आहोंत आणि जीवनांतल्या साध्यासुध्या आनंदाला पारखें होत आहोंत– या गोष्टी मधुकरला तीव्रतेनें जाणवल्या. कितीतरी दिवसांपासून आपण सुमित्रेशीं फटकून वागत आहोंत– आणि संसारांत लक्ष घालणें सोडून दिलें आहे, याची त्याला आठवण झाली.

सुखी जीवनाचें त्यानें जें धूसर स्वप्न रंगविलें होतें तें पूर्ण होत नव्हते, आणि म्हणून सुमित्राला आपण फसवलें आहे असें त्याला वाटायला लागले होते. तिला त्यानें कितीतरी आश्वासनें दिलीं होतीं, आणि त्यांवर तिनें विश्वास ठेवला होता. त्यापैकीं आज कांहींच पूर्ण करतां आलीं नव्हतीं–सुमित्रानें त्याला या गोष्टींची कधीं आठवणहि दिली नव्हती– परंतु त्याचें मन त्याला स्वतःला खात होते... सुमित्राच्या साडया अगदीं जुनेर झाल्या होत्या, आणि तरी ती नवीन साडयांसाठीं हट्ट धरत नव्हती–त्यांना एक मूल झालें होते, आणि तिच्या साहजिकच कांहीं स्त्रीसुलभ हौसा होत्या– परंतु मधूची परिस्थिति ओळखून तिनें त्या तशाच दडवून ठेवल्या होत्या. तिच्या मनाचें मोठेंपण त्याला जास्तच बोंचत होतें. तिचा तो हेवाहि करावयास लागला होता! ती असल्या वागण्यानें आपल्याला जास्तच लाजवित असते अशीं त्याची समजूत बनत होती. एकवेळ तिनें भांडणें करून त्रागा करावा, आणि मग आपण आपली परिस्थिति आणि कोंडमारा सांगून मोकळे व्हावें अशी त्याची इच्छा होती. परंतु

ती तसें कांहींच करत नव्हती, तिच्या सोशिकपणाचें त्याला आश्चर्य वाटत होते आणि तशी मग त्याला याचीहि जाणीव झाली कीं आपल्याला तिची ही असली वागणूक बोचत असते. आणि यामुळेंच आपण तिच्यापासून दूर जात आहोंत... तिनें आपल्या स्वत्वाचं समर्पण करून टाकलेलं आहे आणि आपण मात्र कुढत आहोंत. प्रेमाच्या धुंदींत ज्या गोष्टी बोललों होतों त्या प्रत्यक्षांत उतरूं शकलों नाहींत म्हणून अस्वस्थ आहोंत– आपल्या मनांत जो दोन वर्षांपूर्वींचा अक्कड-बाज मधुकर घर करून बसला आहे– तो या काल्पनिक अपमानाला भीत असतो. आणि सुमित्रापासून तोच आपल्याला दूर करत असतो. चुरगाळलेल्या कोटाला आणि तुटलेल्या सँडल्सना हंसत असतो नि तडजोडीला तो घाबरत असतो. जीवनाच्या विशिष्ट चाकोरींत घरंगळत जाणाऱ्या आपल्या व्यक्तिमत्वाला सांवरण्याचं त्या मधुकरमध्यें सामर्थ्य नाहीं आणि प्रामाणिकपणाचीं साधीं माणूसकी देखील त्याच्यामध्यें नाहीं. दोन बाकांच्या मध्यें अंग चोरून दडलेल्या बिनतिकिटाच्या प्रवाशासारखी आपली परिस्थिती झालेली आहे. यांतून आपल्याला मार्ग काढावयाचा आहे. आपल्याला खराखुरा आनंद निर्माण करा-वयाचा आहे. पूर्वीच्यापेक्षां निराळा– वास्तवांतला. आपलीच जी दोन व्यक्तिमत्वें आहेत–त्यांचा सांधा, घालून एक निराळे व्यक्तिमत्व घडवायचें, आणि तें घडविण्यांत सुमित्रेचें सहाय्य घ्यावयाचें– तिला आपण निष्कारणच घाबरतों आहोंत– आज आपण संध्याकाळीं तिला सर्व गोष्टी मनमोकळेपणानें सांगायच्या. ती रागावलीच तर तिची क्षमा देखील मागायची– या असल्या भांबावलेल्या परिस्थितींत हातभार लावण्याचं सामर्थ्य तिच्याखेरीज कुणांतच नाहीं...

या विचारासरशी मधुकरला कितीतरी हलकें वाटलें, आणि आपल्या मनावरील दडपण कमी झाल्याचा त्याला भास झाला.

समोरील बाकावरचा ऐटबाज माणूस अजूनहि आपल्याच ऐटींत

दंग होता. या चमत्कारीक चाकोरीचा मधुकरला अजूनहि उबग येत होता. त्याला आपल्या दुबळेपणाची कींव वाटत होती. डब्यांतल्या लेडीक्लर्क विषयीं त्याच्या कानावर मघाचेंच बोलणें पडत होतें. मधुकरला तें सहन होत नव्हतें... कुणाचा तरी दुबळेपणा भर बाजारांत मांडून त्याचा लिलांव पुकारणाऱ्या या दलालांची त्याला चीड येत होती ती लेडीक्लर्क या गोष्टी ऐकून न ऐकल्यासारखी करत होती.

मग मधुकरला असा भास झाला कीं प्रत्येकाच्या व्यक्तिमत्वामध्यें या लेडीक्लर्कचा अंश आहे. अब्रूचा, अभिमानाचा, दडपल्या जाणाऱ्या व्यक्तित्वाचा–लाचारीचा आणि बंडखोरीचा... दुबळी ऐट व्यभिचारानें लांछित असूनहि या वृत्तीचा उपहास करत असते, आणि म्हणून माणसें जीवनांतल्या खऱ्याखुऱ्या सुखाला पारखी झालेलीं आहेत. आपणहि त्यांच्या पैकींच एक आहोंत...

त्याच्या दुबळेपणाचा एक अंश याच गुळगुळीत चाकोरीवर घरंगळत होता–आणि जें एक नवें व्यक्तिमत्व साकारलें होते– खोट्या अभिमानापेक्षां आणि दुबळेपणापेक्षां तें निराळें होते– प्रामाणिक आणि सात्त्विक होते– तें त्याच्या घरीं पोंचलें होते. "घरीं कां आलांत एवढ्यांतच ?" सुमित्रा आश्चर्यानें आणि भाबडेपणानें विचारत होती.

तो म्हणत होता "तुला माझें दुःख सांगण्यासाठीं आलों आहे. मी तुला घाबरत असतो, आणि मला तुझी भीति वाटते–"

ती आश्चर्यानें विचारते, "माझी भीति वाटते ! कां ?"

तो म्हणतो, "हें कांहीं विचारयचं नाहीं– फक्त मला क्षमा करायची –" ती म्हणत असते–"माझा मधु वेडा आहे वेडा !"

– आणि सुमित्राच्या याच वाक्यावर त्याचें दुबळें व्यक्तिमत्व घरंगळताना सांवरत असते...

❖ ❖ ❖